॥ श्री ॥

# सुलभ-श्रीमद्भागवत

## द्वादश स्कंध

## अध्याय १ ला

परीक्षित् राजा म्हणतो, हे शुका, यदुकुलललामभूत श्रीकृष्ण निजधामीं गेल्यावर कोणाचा वंश या पृथ्वीवर राज्य करूं लागला तें मला सांग ॥१॥

शुकाचार्य म्हणतात, हे राजा, बृहद्रथ कुलांत शेवटच्या पुरंजय नांवाचा जो राजा होणार आहे, त्याचा प्रधान शुनक हा आपल्या स्वामीचा वध करील आणि पुरंजयाच्या सिंहासनावर प्रद्योत नांवाच्या नवीन राजाला बसवील. या प्रद्योताला पालक नांवाचा पुत्र होईल. पालकाचा पुत्र विशाखयूप नांवाचा होऊन विशाखयूपापासून राजकाचा जन्म होईल ॥ २ ॥ ३ ॥ राजकाचा पुत्र नंदिवर्धन, असे हे प्रद्योत कुलांतील पांच राजे एकशें अडतीस वर्षें राज्याचा उपभोग घेतील ॥४॥ या वंशामागून शिशुनाग राजा राज्यारूढ होईल. शिशुनागाचा पुत्र काकवर्ण, काकवर्णाचा क्षेमधर्मा व क्षेमधर्माचा क्षेत्रज्ञ ॥ ५ ॥

पुढें क्षेत्रज्ञाचा पुत्र विधिसार व विधिसाराचा अजातशत्रु असे होतील. अजातशत्रूला दर्भक नामक पुत्र होऊन दर्भकाला अजय नांवाचा पुत्र होईल ॥६॥ या अजयाचा पुत्र नंदिवर्धन व नंदिवर्धनाचा महानन्दि. हे परीक्षित् राजा, शिशुनाग वंशांत एवढे दहाच राजे होऊन ते कलियुगांत तीनशें साठ वर्षें पृथ्वीचें राज्य भोगतील. हे राजा, त्यानंतर महानन्दीला शूद्रस्त्रीपासून झालेला नन्द नांवाचा एक बलवान् पुत्र महापद्म संख्याक सैन्याचा अधिपति होऊन क्षत्रिय वंशाचा नाश करील. यानंतर होणारे राजे प्रायशः

शूद्राप्रमाणें आचरण करणारे व धर्महीन असेच असतील ।। ७ ।। ८ ।। ९ ।। तो महापद्म सैन्याचा अधिपति नन्द पृथ्वीवर सार्वभौम म्हणून राज्य करील व त्याला दुसरा परशुरामच समजून त्याच्या आज्ञेचें उल्लंघन कोणीहि करणार नाहीं ।।१०।। त्या राजाला सुमाल्य आदिकरून आठ पुत्र होतील व ते शंभर वर्षे या पृथ्वीचें राज्य करतील ।।११।। नन्द व त्याचे आठ पुत्र अशा या नऊ प्रसिद्ध राजांचा कोणी एक ब्राह्मण * समूळ नाश करील व त्यांच्यामागें मौर्यवंशांतील राजे कलियुगांत पृथ्वीवर राज्य करतील ।। १२ ।। तोच ब्राह्मण चंद्रगुप्ताला ÷ राज्यावर बसवील. त्या चंद्रगुप्ताचा पुत्र वारिसार + व वारिसाराचा अशोकवर्धन ।। १३ ।। अशोकवर्धनाचा पुत्र सुयश व सुयशाचा संगत. संगताचा पुत्र शालिशूक नांवाचा होऊन शालिशूकाचा पुत्र सोमशर्मा नांवाचा होईल ।। १४ ।। त्या सोमशर्म्याचा शतधन्वा व शतधन्व्याचा बृहद्रथ. हे दहाच × मौर्यकुलीन राजे होत. हे परीक्षित् राजा, हे राजे कलियुगांत एकशें सदतीस वर्षे पृथ्वीचें राज्य करतील व त्यांच्या मागून अग्निमित्र नांवाचा राजा होऊन त्याचा पुत्र पुढें सुज्येष्ठ नांवाचा होईल ।। १५ ।। १६ ।। त्याच्यानंतर वसुमित्र, भद्रक व पुलिंद हे राजे होऊन पुलिंदाचा पुत्र घोष व घोषाचा वज्रमित्र हा पुत्र होईल ।। १७ ।।

वज्रमित्रानंतर भागवत हा राजा होईल व त्याला देवभूति असें विशिष्ट नांव मिळेल. हे राजे शुंग नामक वंशांतील असून ते शंभराहून (१)कांहीं अधिक वर्षे पृथ्वीचा उपभोग घेतील ।।१८।। शुंगानंतर ही पृथ्वी अल्पगुणी अशा कण्व घराण्याकडे जाईल. शुंगांतील देवभूति नामक राजा स्त्रीलंपट असेल. त्याचा कण्व घराण्यांतील वसुदेव नामक बुद्धिमान् अमात्य वध करील व आपण स्वतः राज्य करूं लागेल. वसुदेवाचा पुत्र भूमित्र व भूमित्राचा नारायण ।।१९।।२०।। हे काण्वकुलीन राजे तीनशें पंचेचाळीस वर्षे कलियुगांत राज्य भोगितील ।।२१।। शेवटीं सुशर्मा नांवाच्या काण्व राजाला त्याचा बली नामक शूद्र सेवक ठार करून कांहीं काल राज्यावर बसेल. हा बली आंध्र जातीचा असून मोठा दुष्ट असेल ।।२२।। बलीच्या मागून त्याचा भाऊ कृष्ण हा राजा होईल. कृष्णाचा पुत्र श्रीशांतकर्ण व त्याचा पुढें पौर्णमास हा होईल ।।२३।।

---

* हा ब्राह्मण म्हणजे सुप्रसिद्ध चाणक्य होय. याचें मूळचें नांव विष्णुगुप्त असून त्याला कौटिल्य असेंहि म्हणतात. यानें राजनीतिशास्त्रावर **अर्थशास्त्र** नांवाचा मार्मिक ग्रंथ लिहिला आहे.

÷ चंद्रगुप्ताची माता मुरा हिच्यावरून त्याच्या वंशाला मौर्यवंश म्हणतात.

+ याचें नांव विष्णुपुराणांत 'बिंदुसार' असें दिलें आहे.

× यद्यपि येथें चंद्रगुप्तादिक नऊच राजे अनुक्रमानें सांगितले आहेत, तथापि पराशरादिकांच्या मतानें त्यांमध्यें पांचवा '**दशरथ**' नांवाचा एक राजा आहे आणि त्यासह हे दहा होतात असें समजावें.

(१) एकशें बारा वर्षे असें विष्णुपुराणांत म्हटलें आहे.

पौर्णमासाचा पुत्र लंबोदर आणि लंबोदरानंतर चिबिलक हा राजा होईल. चिबिलकापासून मेघस्वाति होईल आणि मेघस्वातीचा पुत्र अटमान हा होईल ॥ २४ ॥ त्यानंतर अनिष्टकर्मा व हालेय हे राजे होतील. हालेयाचा पुत्र तलक. तलकाचा पुरीषभीरु व त्यानंतर सुनंदन हा राजा होईल ॥ २५ ॥ सुनंदनाच्या मागून चकोर व त्याच्यानंतर बहुनामक राजे येतील. त्या बहु नांवाच्या राजवंशांत शत्रूंना जिंकणारा शिवस्वाति हा शेवटचा राजा होईल. शिवस्वातीचा पुत्र गोमती व गोमतीचा पुत्र पुरीमान् ॥ २६ ॥ त्यानंतर मेदशिरा व शिवस्कंद हे राजे होतील. नंतर शिवस्कंदाचा पुत्र यज्ञश्री हा येईल. यज्ञश्रीचा पुत्र विजय व विजयाचे पुत्र चंद्रविज्ञ व लोमधि ॥ २७ ॥ हे परीक्षित राजा, हे तीस राजे चारशें छप्पन्न वर्षें पृथ्वीचें राज्य भोगतील ॥ २८ ॥ त्यानंतर आभीर वंशांतील सात राजे, आवभृत्य वंशांतील सात राजे, गर्दभवंशीय दहा राजे व कंक कुळांतील सोळा राजे होतील. हे सर्व अतिशय लोभी असतील ॥ २९ ॥

यानंतर आठ यवन राजे व चौदा तुर्की राजे होतील. पुनः दहा गुरुण्ड घराण्यांतील राजे व अकरा मौन घराण्यांतील राजे होतील ॥ ३० ॥ यांतील आभीर, अवभृत्य, गर्दभ, कंक, यवन, तुर्क व गुरुण्ड हे राजे एक लक्ष नव्याण्णव वर्षें राज्य भोगतील व मौन घराण्यांतील अकरा राजे तीनशें वर्षें राज्य करितील. हे राजा, हे राजे नष्ट झाल्यावर किलकिला नगरांतील राजे राज्य करूं लागतील. त्यांत भूतनन्द, वङ्गरि, शिशुनन्दि, त्याचा भाऊ यशोनन्दि व प्रवीरक असे राजे होऊन ते एकशें सहा वर्षें राज्य चालवितील ॥ ३१ ॥ ३२ ॥ ३३ ॥ या राजांना तेरा पुत्र होतील व त्यांना 'बाल्हिक' असें म्हणतील. त्यांच्या मागून पुष्पमित्र नांवाचा क्षत्रिय राजा होऊन त्याचा पुत्र दुर्मित्र हाहि तसाच होईल ॥ ३४ ॥ हे सर्व राजे एकाच काळीं राज्य करतील. त्यांत सात आंध्रवंशीय व सात कोसलवंशीय असतील. कांहीं विदूर देशांत राज्य करतील तर कांहीं निषध देशांत करतील ॥ ३५ ॥

पुढें मगध देशांत बिश्वस्फूर्जि किंवा दुसरा पुरंजय नांवाचा राजा होईल. तो पुलिन्द, यदु, मद्रक, या वर्णांची स्थापना करील ॥ ३६ ॥ तो दुष्टबुद्धीचा पुरंजय बहुतांशीं अधर्मशील अशी प्रजेची स्थिति करील. तो पराक्रमी असल्यामुळें क्षत्रियांचा नाश करून पद्मवती नामक नगरींत राहील व गंगेच्या कांठीं असलेल्या प्रयागापर्यंतच्या सुरक्षित राज्याचा उपभोग घेईल ॥ ३७ ॥ सौराष्ट्र, अवंति, आभीर, शूर, अर्बुद व मालव या प्रांतांतील ब्राह्मण व्रात्य म्हणजे संस्कारहीन होतील व राजे शूद्राप्रमाणें आचरण करितील ॥ ३८ ॥ सिंधु नदीच्या तीरावरील प्रदेश, चंद्रभागा नदीच्या कांठचा प्रांत, कुंतिदेश व काश्मीर या देशांवर संस्कारहीनत्वामुळें शूद्रप्राय झालेले व वेदसामर्थ्यशून्य असे म्लेंच्छ राजे राज्य करितील ॥ ३९ ॥ हे परीक्षित राजा, हे सारे समकालीन म्लेंच्छप्राय झालेले राजे अधर्म व असत्य यांत दंग राहून देण्याच्या कामीं कंजुष व रागांत मात्र तीव्र असे असतील. ते स्त्रिया, बालकें, ब्राह्मण, गाई इत्यादिकांचा वध करूं लागतील. दुसऱ्यांच्या स्त्रिया व धन

यांचा लोभ धरितील. त्यांचा उत्कर्ष व अपकर्ष हे बहुतेक एकाच वेळीं होतील व त्यांचें सामर्थ्य व आयुष्य हीं अल्प असतील ॥ ४०, ४१ ॥ ते संस्कारविहीन होऊन कर्में करणार नाहींत व रजोगुण आणि तमोगुण यांनीं व्याप्त असे असतील. ते म्लेंच्छ राजे दिसण्यांत लोकरंजन करणारे क्षत्रिय दिसले तरी वस्तुतः प्रजांना खाऊन टाकणारेच होतील ॥ ४२ ॥ त्यांच्या रक्षणाखालीं असलेले ते प्रांत अर्थात् त्या राजांच्या शीलाला, आचाराला व बोलण्याला धरूनच आपलें शील, आचार व बोलणें ठेवितील व त्यामुळें त्यांना एकमेकांकडून व त्यांच्या राजांकडून पीडा होऊन ते नाश पावतील ॥ ४३ ॥

## पहिला अध्याय समाप्त



# अध्याय २ रा



शुक्राचार्य सांगतात, हे राजा, त्यानंतर दिवसानुदिवस धर्म, सत्य, पावित्र्य, क्षमा, दया, आयुष्य, बळ व स्मरणशक्ति यांचा,बलवान् अशा कालिकालाच्या योगें नाश होईल ||१|| या कलियुगांत द्रव्य हेंच मनुष्याचें कुल, शील व सद्गुण यांच्या उत्कर्षाचें माप होईल; तसेंच धर्म आणि न्याय यांचा निर्णय करण्याचें साधन बळ हेंच असेल ||२|| स्त्रीपुरुषांचे विवाह एकमेकांच्या आवडीवरच होतील व साऱ्या देवघेवीच्या व्यवहारांत कपटाचेंच साम्राज्य होईल. स्त्री व पुरुष यांचा चांगले-वाईटपणा रतिकौशल्यावर अवलंबून राहून ब्राह्मण्याचें ज्ञापक केवळ यज्ञोपवीत हेंच असेल! ||३|| मनुष्यांचा आश्रम कोणता हें केवळ बाह्य चिन्हांवरून ओळखेल व एका आश्रमांतून दुसऱ्या आश्रमांत गेल्याची खूण म्हणजे बाह्य चिन्हच असेल. कोणाजवळ द्रव्य नसल्यास त्याला न्याय मिळणें कठीण होईल व पांडित्यामध्यें फटकळ बोलण्याचेंच प्राधान्य दिसेल ||४|| द्रव्यहीनपणा हें दुर्जनत्वाचें लक्षण होऊन दाम्भिकपणा म्हणजे साधुपणा ठरेल. तसेंच प्रत्यक्ष स्वीकार हेंच विवाहाचें द्योतक होऊन शरीर अलंकृत करणें हेंच स्नान ठरेल ||५|| दूर अंतरावर असलेल्या जलसंचयालाच तीर्थ म्हणूं लागतील व केश ठेवणें हें सौंदर्याचें चिन्ह समजतील. स्वतःचें पोट भरणें हाच पुरुषार्थ व धिटाईनें बोलणें हेंच सत्य असें मानितील ||६||

कुटुंबपोषण करणें हें दक्षतेचें लक्षण मानून द्रव्यासाठीं धर्माचरण करणें हेंच कीर्तीचें साधन समजतील. याप्रमाणें दोषयुक्त समजुतींच्या लोकांनीं हें सारें जग भरून गेलें असतां ब्राह्मण, क्षत्रिय ,वैश्य किंवा शूद्र यांपैकीं जो कोणी बलिष्ठ असेल त्यालाच राज्य प्राप्त होईल. लोभी आणि दरोडेखोरांप्रमाणें क्रूर अशा राजांकडून स्त्रिया व द्रव्य यांवर घाले पडून लोक त्रस्त झाले म्हणजे ते गिरिकंदारांकडे धांव घेतील व तेथें त्यांना झाड-पाला, कंदमुळें, मांस, मध, फळें, फुलें किंवा बिया यांवर निर्वाह करण्याची पाळी येईल ||७, ८, ९|| पाऊस पडेनासा होऊन दुष्काळ पडतील व करांच्या भाराखालीं प्रजा चिरडून जाईल. त्यामुळें थंडी, वारा, ऊन्ह, पाऊस, दंव यांचा त्यांना फार उपद्रव होऊन त्या एकमेकांना पीडा देतील व शेवटीं नाश पावतील ||१०|| भूक, तहान, रोगराई व काळजी यांमुळें लोक गांजून जातील वअशा स्थितींत या कलियुगांतील प्रजेचें आयुष्य अधिकांत अधिक म्हणजे वीस किंवा तीस वर्षें इतकेंच असेल ! ||११|| कलियुगाच्या दोषांमुळें लोकांचीं शरीरें झिजून लहान झालीं, वर्ण व आश्रम यांच्या धर्माचें पालन कर-ण्याचा जो वेदविहित धर्ममार्ग तो लोकांतून नष्ट झाला, धर्मामध्यें नास्तिकवादाचें प्राबल्य होऊन राजे दरोडेखोरांसारखे झाले, लोक चोरी–खोटें बोलणें–निष्कारण हिंसा करणें इत्यादि अनेक प्रकारचें दुर्वर्तन करूं लागले, सर्व वर्णांचे लोक शूद्राप्रमाणें आचरण करूं

लागले, गाई शेळ्यांप्रमाणें लहान होऊन सारे आश्रम गृहस्थाश्रमासारखे झाले, लग्नसंबंधानें जोडलेलीं माणसें हींच काय तीं संबंधी असें मानण्यांत येऊं लागलें, झाडझुडपें लहान आकाराचीं होऊन मोठे वृक्षही शमीप्रमाणें छायाहीन झाले, मेघांमध्यें कडकडाटाशिवाय दुसरें कांहीं नाहीं असें होऊन घरेंदारें ओस पडूं लागलीं व लोक गाढवाप्रमाणें मूर्खपणाचें वर्तन करूं लागले, आणि अशा रीतीनें कलिकालाचा अंत होण्याचा समय आला, म्हणजे धर्माच्या रक्षणासाठीं भगवान् विष्णु सत्त्वांशानें अवतार धारण करील ॥१२–१६॥ स्थावरजंगमात्मक विश्वाचा गुरु असा जो सर्वसत्ताधारी परमात्मा श्रीविष्णु त्याचा अवतार साधूंच्या धर्माचें रक्षण करावें आणि त्यांच्या कर्मांचा क्षय करून त्यांना मोक्षपद द्यावें यासाठींच असतो ॥१७॥ असो. भगवानाचा हा अवतार शंभळ नामक गांवाच्या मुख्याधिकारी विष्णुयश नांवाचा असेल व त्या थोर ब्राह्मणाच्या घरीं भगवान् विष्णु कल्किरूपानें प्रकट होईल ॥१८॥ जगाचा नायक कल्किरूप भगवान्, देवदत्त नांवाच्या वेगवान् घोड्यावर आरूढ होईल व आठ प्रकारचें ऐश्वर्य व उत्तम गुण यांनीं युक्त असा तो आपल्या वेगवान् घोड्यावर बसून पृथ्वीवर संचार करील आणि राजाचीं बाह्यचिन्हें धारण करणाऱ्या कोट्यवधि दरोडेखोरांचा निःपात करील. त्याच्या तेजस्वीपणाला कसलीच तोड मिळणार नाहीं ॥१९॥२०॥

याप्रमाणें सर्व दरोडेखोरांचा निःपात झाला असतां, सर्व देशांतील लोकांना भगवान् श्रीकृष्णाच्या अंगावरील उटीच्या अत्यंत पवित्र सुवासानें युक्त अशा वायूचा स्पर्श घडेल व त्यामुळें त्यांचीं अंतःकरणें अगदीं निर्मळ होतील ॥२१॥ मग त्यांना होणारी संतति बलवान् शरिरांनीं युक्त अशी होईल. कारण त्यांच्या अंतःकरणांत सत्त्वमूर्ति भगवान् श्रीहरि वासुदेवाचें ध्यान अखंड चालू असेल ॥ २२ ॥ धर्मरक्षण करणारा भगवान् श्रीहरि जेव्हां कल्किरूपानें अवतार घेईल, त्या वेळीं कृतयुग चालू होईल व लोक सत्त्वगुणसंपन्न होतील ॥ २३ ॥ हें जें कृतयुग चालू होईल त्या वेळीं चंद्र, सूर्य, पुष्य नक्षत्र आणि बृहस्पति यांचा एकत्र संयोग होईल ॥२४॥ हे परीक्षित् राजा! याप्रमाणें सोमवंश व सूर्यवंश यांत जे राजे आजवर होऊन गेले, आज जे राज्य करीत आहेत व यापुढें जे होणार आहेत त्यांचें संक्षिप्त वर्णन मीं तुला सांगितलें आहे ॥ २५ ॥ राजा, तुझ्या जन्मापासून नन्द राजाला राज्याभिषेक होईपर्यंतचा जो काळ तो एक हजार एकशें पंधरा ( १११५ ) वर्षांचा होय- ॥ २६ ॥ आकाशांत सप्तर्षि नामक तारापुंज उगवत असतां त्यांतील जे दोन प्रथम उगवलेले दिसतात, त्या दोघांच्या मधोमध जें नक्षत्र रात्रीं दिसतें, त्या नक्षत्रांत सप्तर्षि मनुष्यांचीं शंभर वर्षें राहतात. सांप्रत काळीं तुझ्या राजवटींत ते सप्तर्षि मघा नक्षत्रांत आहेत ॥ २७ ॥ २८ ॥ भगवान् श्रीविष्णूचा सूर्यासमान दैदीप्यमान असा हा श्रीकृष्णअवतार जेव्हां आपल्या वैकुंठलोकीं गेला, त्या वेळीं कलीनें लोकांमध्यें प्रवेश केला. कारण, तेव्हांपासून लोकांचें मन पापकृत्यांत आनंद मानूं लागलें ॥ २९॥

तो रमापति भगवान् जोंपर्यंत या पृथ्वीला आपल्या पदकमलांचा स्पर्श करीत होता, तोंपर्यंत कलीला आपला पराक्रम दाखवितां आला नाहीं ॥ ३० ॥ जेव्हां सप्तर्षि तारा- पुंज मघा नक्षत्रांत प्रविष्ट झाला, तेव्हां देवांच्या बाराशें वर्षांच्या अवधीचा कलिकाल चालू झाला ॥ ३१ ॥ जेव्हां ते सप्तर्षि मघांतून निघून पूर्वाषाढांत जातील तेव्हां म्हणजे नंदाच्या राजवटीपासून या कलिकालाची भरभराट होईल ॥ ३२ ॥ ज्या दिवशीं ज्या क्षणाला श्रीकृष्ण निजधामास गेला, त्या दिवशीं त्या क्षणीं कलियुग चालू झालें असें प्राचीन इतिहासवेत्त्यांचें म्हणणें आहे ॥ ३३ ॥ हें चौथें—म्हणजे कलियुग चालू होऊन देवांचीं सहस्र वर्षें लोटलीं म्हणजे पुनः कृतयुग चालू होईल व तेव्हां मनु- ष्यांच्या मनांत आत्मज्ञानाचा प्रकाश पडेल ॥ ३४ ॥ मनूपासून उत्पन्न झालेल्या क्षत्रिय राजवंशाचीं जीं स्थित्यंतरें पृथ्वीवर झालीं किंवा होतील असें सांगितलें, तशींच तीं त्या त्या युगामध्यें ब्राह्मण, वैश्य, शूद्र यांचींहि होतीं व होतील असें समजावें ॥३५॥ हे जे थोर मनाचे, नांवावरूनच ओळखूं येणारे व गोष्टींतच राहिलेले पुरुष, त्यांची कीर्ति तेवढी पृथ्वीवर राहिली आहे ॥३६॥ शंतनूचा भाऊ देवापि आणि इक्ष्वाकु- वंशांतील मरु हे दोघे मोठ्या योगसामर्थ्याचा अवलंब करून कलाप नांवाच्या गांवीं राहिलेले आहेत ॥ ३७ ॥ कलियुग संपलें म्हणजे ते येथें येतील. त्यांना श्रीकृष्णाकडून उपदेश मिळालेला असल्यामुळें ते पूर्वीप्रमाणें चार वर्ण व चार आश्रम यांनीं युक्त अशा धर्माची स्थापना करतील ॥३८॥ कृत, त्रेता, द्वापर व कलि हीं चार युगें होत. हीं युगें या विशिष्ट क्रमानें पृथ्वीवरील प्राण्यांमध्यें घडत असतात ॥ ३९ ॥ हे परीक्षित् राजा, हे जे राजे मीं तुला सांगितले ते व तसेंच दुसरेहि या भूमीला आपली म्हणत असत; पण शेवटीं ह्या भूमीला सोडून ते मृत्युपंथास गेले ! ॥ ४० ॥ हा जो देह आहे त्याला प्रथम राजा असें नांव असलें, तरी शेवटीं त्याला कृमि, विष्ठा, भस्म हेंच स्थित्यंतरानुरूप नांव मिळा- वयाचें असतें ! असें असतांहि त्या देहासाठीं मनुष्य जो प्राण्यांशीं वैर करतो त्यांत त्याला कोणता स्वार्थ दिसतो बरें? या वैरापासून नरकाचीच निष्पत्ति होणार ! ॥ ४१ ॥ 'ही सारी पृथ्वी माझ्या पूर्वजांच्या हातांत होती, सांप्रत मी या पृथ्वीवर अग्रगण्य आहें; पण यापुढें ही माझ्या मुलाच्या, नातवाच्या किंवा पुढील वंशजांच्या हातांत कशी राहील' अशी या राजांना नित्य चिंता लागलेली असते ॥ ४२ ॥ वस्तुतः देह म्हणजे तेज, पाणी, अन्न इत्यादिकांचा गोळा आहे; पण ते अज्ञानी राजे त्यालाच आत्मा असें मानून व ही पृथ्वी आपली आहे असें समजून राहिले असतां शेवटीं तो देह आणि ती पृथ्वी या दोहोंचाही त्याग करून मृत्यु पावले ! ॥ ४३ ॥ हे परीक्षित् राजा, ज्या ज्या राजांनीं आजवर आपल्या सामर्थ्यानें पृथ्वीचा उपभोग घेतला ते ते सर्व राजे काळानें कथारूप करून टाकिले आहेत, आणि त्यांची स्मृति आतां गोष्टींत मात्र राहिली आहे ॥ ४४ ॥

दुसरा अध्याय समाप्त

———

# अध्याय ३ रा



शुक्राचार्य सांगतात, हे राजा, हे राजे म्हणजे काळाचीं खेळण्याचीं केवळ बाहुलीं होत; पण ते पृथ्वी जिंकण्याचा प्रयत्न करूं लागले म्हणजे, ही पृथ्वी त्यांचा तो खटाटोप पाहून हंसतोणिअ म्हणते, ' काय आश्चर्य आहे पाहा ! हे असले राजे मला जिंकू पाहतात ' ॥ १ ॥ राज्यवासना ही पाण्याच्या फेसाप्रमाणें निःसार आहे. असें असतांहि त्यावासनेवर जे मोठी श्रद्धा ठेवितात, तेराजे जाणते व श्रेष्ठ असले तरी त्यांची ती वासना व्यर्थच जाते ॥ २ ॥ " आपण प्रथम सहाही मनोविकारांना जिंकू मग प्रतिस्पर्धी राज्यांच्या मंत्र्यांना कून व त्या जिराजांनाहि दूर करून नंतर त्यांचे सचिव, नागरिक लोक, मंडळी, हत्तींचे स्वामी इत्यादिकांना जिंकू ॥ ३ ॥अशा रीतीनें समुद्रापर्यंतची सारी पृथ्वी क्रमानें जिंकू. " अशी इच्छा मनांत दृढ धरणारे हे राजे, जवळच उभ्या असलेल्या मृत्यूला मात्र पाहूं शकत नाहींत ! ॥ ४ ॥ ते समुद्रापर्यंत पसरलेल्या मला जिंकून पराक्रमानें समुद्रांत देखील प्रवेश करतात; पण इंद्रियें जिंकण्याच्या फळाच्या मानानें या विजयाचें मोल कितीसें आहे बरें ? इंद्रियविजयाचें फळ म्हटलें तर प्रत्यक्ष मोक्षच होय ॥ ५ ॥ स्वायंभुव आदिकरू नकुल-संस्थापक मनु व त्यांचे पुत्र हे देखील ज्या मला सोडूनचआपल्या मार्गानें निघून गेले, त्या मला युद्धांत जिंकण्याची हे अज्ञानी राजे इच्छा करितात ! ॥ ६ ॥ माझ्यासाठीं पितापुत्र, भाऊभाऊ यांच्यामध्यें सुद्धां कलह होतो; कारण ' हें राज्य माझें ' अशी आसक्ति त्यांच्या अंतःकरणांत दृढ झाल्यामुळें ते दुष्ट झालेले असतात ॥ ७ ॥ ' हें सारें राज्य माझें आहे, मूर्खा, तें तुझें नव्हे ! ' असें ते राजे एकमेकांना म्हणून एकमेकांशीं वैर करितात व माझ्यासाठीं आपसांत मारामारी करून मरून जातात ॥ ८ ॥ पृथु, पुरुरवा, गाधि, नहुष, भरत, अर्जुन, मांधाता, सगर, राम, खट्वांग, धुन्धुहा, रघु, तृणबिन्दु, ययाति, शर्याति शंतनु, गय, भगीरथ, कुवलाश्व, ककुत्स्थ, नळ, नृग, हिरण्यकशिपु, वृत्र, लोकांना रड-विणारा रावण, नमुचि, शंबर, भौम, हिरण्याक्ष, तसाच तारक हे आणि दुसरेहि जे अनेक दत्य व महापराक्रमी राजे होऊन गेले ते सर्व, सर्व गोष्टी जाणणारे शूर असून सर्वांनीं स्वतः अजिंक्य राहून सर्व जग जिंकिलें होतें. ते सर्वजण मरणशील असतांहि ' ही पृथ्वी माझी ' असें मोठ्या आग्रहानें म्हणत होते; पण हे परमेश्वरा, ते शेवटीं काळानें नामशेष झाले व त्यांच्या जीविताचें कांहीं सार्थक्य झालें नाहीं "॥ ९ ॥१०॥ ११ ॥ १२ ॥ १३ ॥ हे राजा, या लोकीं आपली कीर्ति पसरून स्वर्गस्थ झालेल्या मोठमोठ्या पुरुषांच्या ह्या ज्या कथा मीं तुला सांगितल्या, त्या तुझ्यामध्यें खरें ज्ञान प्रादुर्भूत होऊन अंतःकरणांत वैराग्य ठसावें या हेतूनेंच होत. ह्या कथा म्हणजे वाग्देवतेचे विलास होत. त्यांत परम पुरुषार्थाचें स्वरूप कांहीं नाहीं. ॥ १४ ॥ पण त्यांत उत्तम कीर्तिसंपन्न अशा भगवंताचें जें गुणवर्णन वारंवार आलें आहे, तें मात्र पापाचा नाश करणारें आहे. ज्याला म्हणून श्रीकृष्णाच्या ठायीं

भक्ति उत्पन्न व्हावी अशी इच्छा असेल त्यानें हें कृष्णगुणसंकीर्तन नित्य व वारंवार ऐकत असावें ॥ १५ ॥

परीक्षित् राजा म्हणतो, हे शुकमुने, कलियुगामध्यें वृद्धिंगत झालेले जे कलीचे दोष ते लोकांना कोणत्या उपायानें दूर करितां येतील तें मला नीट समजावून सांगा ॥ १६ ॥ तसेंच चारी युगें, त्यांचे गुणधर्म, त्यांच्या अवधीचा काल, प्रलय व उत्पत्ति हीं केव्हां होतात आणि सर्वसत्ताधारी महात्मा, कालस्वरूपी भगवान् याची विष्णुलीला कशी चालते, हेंहि मला सांगा ॥ १७ ॥

शुकाचार्य सांगतात, राजा, कृतयुगामध्यें तत्कालीन लोक ज्या धर्माचें आचरण करितात, तो चार पायांचा म्हणजे चार आधारांवर अवलंबून असतो. त्या दिव्य धर्माचे चार आधारभूत पाय म्हणजे—सत्य, दया, तपश्चर्या व दान हे होत ॥ १८ ॥ त्या युगांतील लोक संतुष्ट, दयाळु, सर्वांशीं मैत्री करणारे, शांत स्वभावाचे, इंद्रियांचें नियमन करणारे; सहनशील, आत्मस्वरूपांत आनंद मानणारे, सर्वांवर समदृष्टि ठेवणारे व बहुधा अध्यात्म-विद्येंत परिश्रम करणारे असतात ॥ १९ ॥ त्रेतायुगांत असें होतें कीं, अधर्माचे जे असत्य, हिंसा, असंतोष व कलह हे चार आधारभूत पाय त्यांच्या योगानें धर्माच्या चार आधारांतील एक आधार हळूहळू ऱ्हास पावतो ॥ २० ॥ राजा, त्या युगांतील लोक वेद-विहित कर्में व तपश्चर्या यांत मग्न असतात. फारशी हिंसा न करणारे व विषयपराङ्मुख असे असतात. त्यांतील वर्णांमध्यें ब्राह्मण हे श्रेष्ठ असून ते धर्म, अर्थ व काम या पुरुषार्थांवर दृष्टि ठेवणारे व तिन्हीं वेदांचा अभ्यास आजन्म करणारे असे असतात ॥ २१ ॥ द्वापर युगामध्यें अधर्माच्या हिंसा, असमाधान, असत्य व द्वेष या लक्षणांमुळें धर्माचीं तप, सत्य, दया व दान हीं अंगें अर्धवट ऱ्हास पावतात ॥ २२ ॥ तथापि त्या युगांतील लोक कीर्तिमान्, सुस्वभावी, आपल्या वेदशाखेचें अध्ययन करणारे, संपत्तिमान्, कुटुंबवत्सल व आनंदी असून चारी वर्णांमध्यें क्षत्रिय व ब्राह्मण यांना श्रेष्ठपणा असतो ॥ २३ ॥ पण कलियुगामध्यें अधर्माच्या कारणांची वृद्धि होऊन त्यामुळें धर्माचे आधार ऱ्हास पावतात व त्यांतला चतुर्थांश मात्र उरतो व शेवटीं तर तोहि नष्ट होतो ॥ २४ ॥ त्या युगांत लोक लोभी, दुराचारी, निर्दय, निष्कारण वैर करणारे, दुर्दैवी, महत्त्वाकांक्षी असे असून त्यांत शूद्र व कोळी यांना प्राधान्य असतें ॥ २५ ॥ पुरुषामध्यें सत्त्व, रज व तम असे जे तीन गुण कालानें प्रेरिलेले आढळून येतात, ते इंद्रिययुक्त देहांत वावरत असतात ॥ २६ ॥ त्यांतील सत्त्वगुणामध्यें जेव्हां मन, बुद्धि व इंद्रियें हीं स्थिर असतात, तेव्हां त्या काळाला कृतयुग म्हणून समजावें. कारण त्यामुळें ज्ञान व तपश्चर्या यांविषयीं मनुष्याला आवड उत्पन्न होते ॥ २७ ॥ जेव्हां धर्म, अर्थ व काम यांविषयीं मनुष्यांना प्रेम वाटतें त्या वेळीं, हे बुद्धिमान् परीक्षित राजा, रजोगुणात्मक असें त्रेतायुग असतें असें समज ॥ २८ ॥

ज्या वेळीं लोभ, असंतोष, अभिमान, भोंदूपणा, हेवा आणि काम्य कर्मांविषयींची आवड या गोष्टी मनुष्यांत दिसून येतात, त्या वेळीं रजोगुण व तमोगुण यांच्या मिश्र स्वरूपानें युक्त असें द्वापर युग असतें ॥ २९ ॥

जेव्हां कपट, असत्य, आळस, झोपाळूपणा, हिंसा, कष्टीपणा, शोक, मोह, भय, दैन्य यांचा प्रादुर्भाव होतो, तेव्हां त्या काळाला तमोगुणयुक्त कलियुग असें म्हणतात ॥३०॥ या कलियुगामध्यें प्राणी आकुंचित दृष्टीचे, अभागी, खादाड, विषयलंपट, दरिद्री, असे होऊन स्त्रिया स्वैरवर्तनी व व्यभिचारी होतील ॥३१॥ सारे देश चोर व दरोडेखोरांनीं भरून जातील, वेदांना नास्तिकवाद्यांमुळें दोष लागतील. राजे लोक प्रजेला खाऊन टाकणारे होतील व ब्राह्मणही विषयसेवन व उदरंभरण यांतच दंग असतील ॥३२॥ तरुण मुलें ब्रह्मचर्य व्रत पाळणार नाहींत व अपवित्र वर्तन करतील, कुटुंबवत्सल गृहस्थाश्रमी पुरुष भिक्षा मागूं लागतील, तपश्चर्या करणारे गांवांतच राहतील आणि संन्यासी द्रव्यावर आसक्त होतील ॥३३॥ स्त्रिया लहान शरिराच्या पण मोठ्या खादाड होतील, त्यांना संतति फार होईल व त्या निर्लज्ज बनतील. त्या नित्य कठोर भाषण करतील आणि चोरी, कपट व धाडस या गोष्टी करणाऱ्या होतील ॥ ३४ ॥ व्यापारोपजीवी असे वैश्य लोक शूद्र व कपटी वर्तन करून व्यापार करितील व आपत्काल नसतांहि निंद्य उद्योग चांगले मानूं लागतील ॥३५॥ धनी अगदीं उत्तम असला तरी त्याच्याशीं द्रव्य नाहींसें झाल्याबरोबर सेवक त्याचा त्याग करतील व धनी सुद्धां कुलीन सेवकांवर आपत्ति आली असतां त्यांचा व गाई दूध देत नाहींशा झाल्या म्हणजे त्यांचा त्याग करितील ॥३६॥ कलियुगामध्यें पत्नीसंबंधाचीं मात्र नातीं जडवून घेणारे विषयलंपट दुबळे पुरुष पिता, भाऊ, मित्र व ज्ञातिबांधव यांचा त्याग करून मेहुणे व मेहुण्या यांशींच हितगुज करीत राहतील ॥३७॥ शूद्र तपस्व्यांच्या वेषानें उपजीविका करून दक्षिणा घेऊं लागतील व ज्यांना धर्म म्हणजे काय याची वार्ताहि नाहीं असे लोक व्यासपीठावर बसून धर्माचें विवेचन करूं लागतील ॥३८॥ लोक नित्य खिन्न मनाचे राहून दुष्काळ व करांचें ओझें यांमुळें ते अगदीं टेकीस येतील. हे राजा, देशांत अन्न नाहीं व पाऊस पडणार नाहीं अशा भीतीनें लोक कष्टी होतील. अन्न, वस्त्र, खाणें, पिणें, अंथरूण, विषयसेवन, स्नान, अलंकार यांना ते पारखे होऊन भुतांसारखे दिसूं लागतील. कलियुगांत लोकांची स्थिति अशी होणार आहे ॥३९, ४०॥ त्या कलियुगांत कवडीइतक्या द्रव्यासाठीं सुद्धां लोक स्नेहसंबंध तोडून भांडण करितील, फार काय पण अत्यंत प्रिय असा आपला प्राणहि द्रव्यासाठीं देण्यास कचरणार नाहींत ! ॥४१॥ मातापितरें वृद्ध झालीं असतां लोक त्यांचें रक्षण करणार नाहींत; ते क्षुद्र बुद्धीचे, विषयमग्न व पोटभरू होतील व सर्व गोष्टींत कुशल असलेल्या पुत्राचीही जोपासना करणार नाहींत ॥४२॥ हे राजा, कलियुगामध्यें लोकांचीं मनें नास्तिक विचारांनीं बहुधा बहकून जातील व त्यामुळें जगताचा श्रेष्ठ गुरु कीं ज्याच्या पदकमलाला त्रैलोक्यांचे स्वामी असे ब्रह्मादि देवहि नमस्कार

करतात, अशा भगवान् श्रीविष्णूचें पूजन करणार नाहींत ॥ ४३ ॥ मरणास टेंकलेला रोगी किंवा रस्त्यांत चालतांना ठेंच लागून पडणारा मनुष्य, त्या असहाय स्थितीमध्यें ज्या भगवन्नामाचें गायन केल्यानें कर्माचें बंधन तोडून उत्तम गतीस जातो, त्या परमेशाचें पूजन कलियुगांत लोक करणार नाहींत ॥ ४४ ॥ अन्नादि पदार्थ, विशिष्ट देश आणि इंद्रियांचे व्यापार यांत कलियुगामुळें उत्पन्न होणारे जे मनुष्यांचे सारे दोष ते हृदयांत राहिलेला भगवान् श्रीविष्णु नाहींसे करितो ॥ ४५ ॥ त्या भगवंताच्या गुणांचें श्रवण व गायन करून व त्यांचें मनांत ध्यान करून आणि तशीच त्याची आदरपूर्वक पूजा करून हृदयांत स्थापना केली असतां तो मनुष्याचें सहस्रावधि जन्मांचें पातक नष्ट करितो ! ॥ ४६ ॥ तापलेल्या सोन्यांत असलेला अग्नि जसा त्या धातूंतील दोषयुक्त भाग जाळून टाकितो, त्याप्रमाणें अंतःकरणांत भगवान् श्रीविष्णूचें वास्तव्य झालें असतां तो योगी लोकांच्या मनांतील पापवासनांचा क्षय करितो ॥ ४७ ॥ अनन्त असा भगवान् विष्णु हृदयांत राहिला असतां त्यामुळें जशी अंतःकरणाची अत्यंत शुद्धि होते, तशी शुद्धि विद्या, तपश्चर्या, योगसाधन, स्नेहसंबंध, तीर्थस्नान, व्रताचरण, दान किंवा जपजाप्य यांनींहि होत नाहीं ॥ ४८ ॥ यास्तव, हे परीक्षित् राजा, सर्व प्रकारें मनःपूर्वक प्रयत्न करून त्या भगवंताची हृदयांत स्थापना कर. तुझा अंतकाल जवळ आला असल्यामुळें तूं सावधानपणें तसें केलें असतां तुला उत्तम गति प्राप्त होईल ॥ ४९ ॥ अंतकाल समीप आला असतां मनुष्यांनीं भगवान् परमेश्वराचें ध्यान करावें. कारण, हे राजा, तो सर्व प्राण्यांचा अंतर्यामी व आधार असून, आपली भक्ति करणाराला तो आत्मस्वरूपाची प्राप्ति करून देतो ॥५०॥

हे राजा कलि म्हटला तर दोषांचा समुद्र आहे खरा; पण त्याच्याजवळ एक मात्र मोठा गुण आहे. तो असा कीं, त्या कलियुगांत केवळ श्रीकृष्णाच्या गुणांचें संकीर्तन केल्यानें मनुष्याची सर्व बंधांपासून मुक्तता होऊन त्याला परमपदाची प्राप्ति होते ॥ ५१ ॥ कृतयुगामध्यें श्रीविष्णूचें ध्यान केल्यानें, त्रेतायुगांत त्याचें यज्ञांनीं पूजन केल्यानें आणि द्वापर युगांत त्याची सेवा केल्यानें जें फळ मिळत होतें, तें फळ कलियुगांत केवळ श्रीहरीच्या कीर्तनानेंच मिळतें ॥ ५२ ॥

## तिसरा अध्याय समाप्त

———

# अध्याय ४ था



शुकाचार्य म्हणतात, हे परीक्षित् राजा, परमाणूपासून दोन परार्धाइतक्या काळाचें बर्णन मीं पूर्वी केलें आहेच. आतां कृतादि युगांच्या काळाचें प्रमाण, तसेंच कल्प म्हणजे सृष्टीच्या उत्पत्ति-स्थितीचा काळ व लय यांविषयीं तुला सांगतों, तें ऐकून घे ॥ १ ॥ चार युगांचे फेरे सहस्र वेळां होऊन गेले म्हणजे त्या अवधीला ब्रह्मदेवाचा दिवस म्हणतात. हा ब्रह्मदेवाचा दिवस म्हणजेच कल्प होय. राजा, या कल्पामध्यें चौदा मनु होतात ॥ २ ॥

कल्पाचा हा काळ संपला म्हणजे येणारा जो तेवढ्याच अवधीचा काळ तो प्रलयाचा काळ असून त्यालाच ब्रह्मदेवाची रात्र असें म्हटलें आहे. त्या काळामध्यें हे स्वर्ग, मृत्यु व पाताळ असे तीन्ही लोक आपल्या मूल प्रकृतींत लीन होतात. या प्रलयाला नैमित्तिक प्रलय म्हणतात. या प्रलयामध्यें शेषशायी असा भगवान् स्वयंभू विश्वनिर्माता सारें विश्व आपल्या स्वतःच्या शरिरांत विलीन करून निद्रा घेत राहतो ॥ ३,४ ॥ परमश्रेष्ठ जो ब्रह्मदेव त्याच्या आयुष्याचें दोन परार्धाइतकें कालमान होऊन गेलें म्हणजे सातही मूलप्रकृतींचा लय होतो ॥ ५ ॥ हे राजा, या प्रलयाला प्राकृतिक प्रलय असे म्हणतात. या प्रलयाच्या वेळीं महदादि साती प्रकृतींच्या एकीकरणानें उत्पन्न झालेला जो ब्रह्मांडकोश त्याच्या पृथक्करणाचें कारण उपस्थित होऊन तो कोश विलीन होतो ॥ ६ ॥ त्या वेळीं हे राजा, शंभर वर्षे पाऊस मुळींच पडत नाहीं. त्यायोगें अन्नाचा सर्वत्र अभाव झाल्यामुळें लोक भुकेनें व्याकुळ होऊन एकमेकांना खाऊं लागतात व अशा रीतीनें दुष्काळानें पीडिलेले ते सर्व नाश पावतात ॥ ७ ॥ त्या प्रलयाच्या प्रसंगीं समुद्राचें पाणी, देहांतील रक्त, तसाच भूमींतील ओलावा हे सर्व प्रलयकालीन रवि आपल्या अत्यंत उग्र अशा किरणांनीं शोषून घेतो; पण परत मात्र एक थेंबही सोडीत नाहीं ! ॥ ८ ॥ इतक्यांत शेषाच्या मुखांतून प्रलय करणारा अग्नि निघूं लागतो व वायूच्या वेगामुळें तो सर्वत्र पसरून आधींच ओसाड पडलेल्या पृथ्वीवरील जागा जाळून टाकितो ॥ ९ ॥ याप्रमाणें वर-खालीं व सर्व बाजूंनीं, अग्नि व सूर्य यांच्या ज्वाळांनीं भाजून जाणारें हें ब्रह्मांड जळलेल्या शेणाच्या गोळ्यासारखें दिसूं लागतें ॥ १० ॥

त्यानंतर शंभरांहून अधिक वर्षेपर्यंत फार सोसाट्याचा व उग्र असा प्रळयकाळचा वारा वाहूं लागतो आणि सारें नभोमंडळ धुळीनें भरून धुरकटल्यासारखें होतें ॥ ११ ॥ राजा, मग निरनिराळ्या रंगांचे मेघसमुदाय मोठी गर्जना करीत चोहोंकडून शंभर वर्षेपर्यंत वर्षाव करीत राहतात आणि त्यामुळें ब्रह्मांडाच्या पोकळींतील साऱ्या विश्वांत जिकडे तिकडे पाणीच पाणी होऊन जातें ॥ १२ ॥ त्या पाण्याच्या पुराच्या प्रसंगीं भूमीचा गंध हा जो

विशिष्ट गुण तो जलें आपल्यांत विलीन करून घेतात व त्यामुळें गंधहीन झालेली पृथ्वी लय पावूं लागते ॥ १३ ॥ मग पाण्यांतील रस हा जो विशिष्ट गुण तो आपल्यांत शोषून घेतें व त्यामुळें रसहीन झालेलें जलतत्त्व लय पावतें. त्यानंतर तेजाचा गुण जें रूप तें वायु गिळून टाकितो व त्या वेळीं रूपहीन झालेलें तेज वायूंत जाऊन मिळतें. मग वायूचा स्पर्श हा विशिष्ट गुण आकाश गिळून टाकितें व त्यामुळें वायुतत्त्व स्पर्शहीन झालें असतां तें आकाशांत समाविष्ट होतें. हे राजा, त्यानंतर पंचमहाभूतांचें कारण असा जो तामस अहंकार, तो आकाशाचा विशिष्ट गुण जो शब्द त्याला ग्रासून टाकितो व त्यामुळें आकाशतत्त्व त्या तामस अहंकारांत विरून जातें. त्याचप्रमाणें राजस अहंकार आपलीं कार्यें जीं इंद्रियें त्यांना गिळतो, व हे राजा, सात्त्विक अहंकार आपल्या गुणांनीं देवांचा आपल्यांत समावेश करून टाकितो ॥ १४–१६ ॥ मग त्या त्रिविध अहंकाराला महत्तत्त्व गिळून टाकितें आणि सत्त्वादि गुण तें महत्तत्त्व गिळून टाकितात. पुढें काळाची प्रेरणा झाल्यामुळें अव्यक्त अशी प्रकृति सत्त्वादि गुणांना गिळते ॥ १७ ॥

दुधाचें कालान्तरानें दहीं होतें, हा जो विकार, तसे विकार काळाच्या अहोरात्रादि विभागांनीं त्या मूल प्रकृतींत होत नाहींत. कारण, सर्वांचें कारण अशी ती अव्यक्त प्रकृति आदि व अंत यांनीं रहित असून अविनाशी आहे ॥ १८ ॥ त्या प्रकृतींत वाणीचें अस्तित्व नाहीं, मनाचें नाहीं, सत्त्वादि तिन्ही गुणांचें नाहीं अथवा हे जे महत्, अहंकार इत्यादि त्यांचेंहि नाहीं; तींत प्राण, बुद्धि, इंद्रियें, देवता यांचाही संबंध नसून स्वर्गादि लोकांची रचनाहि नसते ॥ १९ ॥ तींत स्वप्नावस्था नाहीं, जाग्रत–अवस्था नाहीं, कीं सुषुप्ति नामक अवस्थाहि नाहीं. तसेंच तींत आकाश, वायु, तेज, उदक व पृथ्वी या पंचभूतांचेंहि अस्तित्व नसतें. ती सुप्तासारखी किंवा शून्यासारखी असून तिच्यासंबंधानें तर्क करणें अशक्य आहे. त्या प्रकृतीला सर्वांचें आदिकारण असें म्हणतात ॥ २० ॥ हा जो प्रलय त्याला प्राकृतिक प्रलय म्हणतात. या प्रलयाच्या वेळीं काळानें प्रेरिल्यामुळें पुरुष व प्रकृति यांच्या शक्ति अगतिक होऊन त्यांच्यांत विलीन होतात ॥ २१ ॥ हे जें दृश्य विकार ते व्यक्त असल्यामुळें व सद्वस्तूच्या अभावीं त्यांचेंहि अस्तित्व संभवत नसल्यामुळें आदि व अंत यांनीं युक्त व म्हणूनच 'असत्' रूप आहेत. त्यांच्या आश्रयानें असणारें जें ज्ञान तें बुद्धि, इंद्रियें व यांचे विषय यांच्या रूपानें राहतें ॥ २२ ॥ दिवा, नेत्र, रूप हे पदार्थ तेजतत्त्वाहून वेगळे नाहींत. त्याचप्रमाणें बुद्धि, इंद्रियें व त्यांचे विषय हे त्याहून सर्वथैव वेगळे दिसणाऱ्या सत्तत्त्वाहून वस्तुतः कांहीं भिन्न नाहींत ॥ २३ ॥ जाग्रत्, स्वप्न व सुषुप्ति या ज्या अवस्था सांगितल्या आहेत त्या बुद्धीच्याच होत. कारण, राजा, हे जे नानाविध पदार्थ आहेत ते त्या अंतरात्म्यावर दिसणारा केवळ भास होत ॥ २४ ॥ आकाशांत जसे कांहीं वेळ मेघ येतात व पुनः नाहींसे होतात, त्याप्रमाणें सावयव असें हें विश्व ब्रह्मस्वरूपावर केव्हां भासतें व केव्हां नाहींसें होतें. कारण, त्या विश्वाला उत्पत्ति व लय हे आहेत ॥ २५ ॥ अवयवयुक्त जे जे पदार्थ आहेत, त्यांत अवयव हेच कारणरूप म्हणून सत्य

होत. कारण कार्यरूप जो अवयवी तो नसतांही अवयवांची प्रतीति येऊं शकते. उदाहरण, तन्तु हे जे कापडाचे अवयव व कापड हा जो अवयवी, त्यांत कापड नसतांहि तंतूंची प्रतीति होत असते ॥ २६ ॥ ज्या वस्तूंचा बोध कार्यकारणसंबंधावरून होतो, त्या वस्तू आभासात्मकच होत. कारण आदि व अंत यांनीं युक्त असें जें तें सर्व 'असत्' रूप असून एकमेकांच्या सापेक्षतेनेंच त्याचा बोध होत असतो ॥ २७ ॥ हा जो विश्वस्वरूपी विकार तो व्यक्तरूप असतांहि अंतरात्म्याशिवाय त्याचें थोडें देखील ज्ञान होणें शक्य नाहीं. जर त्याचें ज्ञान स्वतंत्रपणें होऊं शकलें असतें, तर तोहि त्या अंतरात्म्याप्रमाणें चैतन्यस्वरूपच असेल. तात्पर्य, मग अंतरात्म्याहून भिन्न व अचेतन असें उरलें काय ? ॥ २८ ॥ हे राजा, सत्य पदार्थ म्हणून जो आहे तो नित्य एकच असतो. अज्ञाणी मनुष्य देखील सत्य अनेक प्रकारचें आहे असें म्हणत नाहीं. मग विश्वांत हें अनेकपण कां भासतें ? तर तें भासण्याचें कारण केवळ उपाधि होत. ज्याप्रमाणें आकाश एक असतांहि घटांत कोंडलेलें आकाश, घरांत कोंडलेलें आकाश असा भेद घट व घर या उपाधींमुळें त्यांत दिसतो किंवा सूर्यबिंब एकच असतांहि पाण्यांत त्याचें प्रतिबिंब भिन्न दिसतें, अथवा वायु एक असतांहि शरीरांतील वायु व बाहेरचा वायु जसा भिन्न भिन्न भासतो, तसाच हा प्रकार होय ॥ २९ ॥ किंवा आणखी उदाहरण द्यावयाचें तर सोनें एक असतांहि व्यवहारकृत्यांमध्यें निरनिराळ्या कार्यामुळें, सरी, पाटल्या, गोट अशा अनेक प्रकारांनीं माणसें त्याला नांवें देतात, त्याप्रमाणें इंद्रियांचा नियंता असा जो भगवान् परमात्मा तो एकच असतांहि सामान्य माणसें किंवा वैदिक ऋषि त्याला अनेक नांवांनीं संबोधितात ॥ ३० ॥ अथवा मेघ जसा सूर्याच्या उष्णतेनें उत्पन्न झालेला असून व सूर्याच्या तेजामुळें सूर्याचा अंश अशा नेत्रेंद्रियाला प्रतीत होत असून त्या नेत्रालाच तो केव्हां केव्हां सूर्य अदृश्य होईल असें करतो, तसा अहंकार हा ब्रह्माचें कार्य असूनही व ब्रह्मामुळेंच प्रतीतीस येत असतांहि त्या ब्रह्माचाच अंश अशा जीवाला बंधन करून ब्रह्मापासून दूर करितो ॥ ३१ ॥ पण सूर्याच्या तेजामुळें मेघ वितळून गेला म्हणजे नेत्र जसा आपलेंच रूप जो सूर्य त्याला पाहूं शकतो, त्याप्रमाणें ब्रह्मज्ञानानें अहंकाररूप उपाधि वितळून गेला म्हणजे जीवाला आपलें सत्स्वरूप जें ब्रह्म त्याचें स्मरण होतें ॥ ३२ ॥

हे राजा, याप्रमाणें या सदसद्वस्तुविवेकरूपी शास्त्रानें मायेनें निर्मिलेलें अहंकाररूपी आत्म्याचें बंधन तोडून टाकिलें म्हणजे अविनाशी अशा आत्म्याचा नित्य अनुभवच काय तो मागें राहातो. या प्रकाराला आत्यंतिक प्रलय असें म्हटलें आहे ॥ ३३ ॥ हे राजा, आतां याशिवाय ब्रह्मदेवापासून मुंगीपर्यंत प्रत्येक जीवाला प्रत्येक क्षणीं उत्पत्ति व प्रलय होत असतात, असें सूक्ष्म विचार करणारांचें म्हणणें आहे ॥ ३४ ॥

काळप्रवाहाच्या वेगानें एका बाजूनें ऱ्हास पावून दुसऱ्या बाजूनें भरून येत असलेल्या वस्तूंच्या ज्या अवस्था आहेत, त्याच त्यांच्या नित्य अशा उत्पत्तिप्रलयांचें कारण होत ॥ ३५ ॥ पण अशा भिन्न भिन्न अवस्था अनादि, अनंत व परम समर्थ अशा काळाच्या

योगानें प्रत्येक वस्तूंत घडत असतांहि प्रतिक्षणींच्या त्यांच्या सूक्ष्मत्वामुळें तेव्हांच्या तेव्हां दिसून मात्र येत नाहींत. वेळावेळानें त्या प्रतीतीस येतात., उदाहरण, आकाशांत फिरणाऱ्या तेजोगोलांच्या गति आपल्याला प्रतिक्षणीं भासत नाहींत, तथापि थोड्या वेळानें त्या दिसून येतात ॥ ३६ ॥ याप्रमाणें नित्य, नैमित्तिक, त्याचप्रमाणें प्राकृतिक व आत्यंतिक असे जे प्रलय आहेत, त्यांचें मीं वर्णन केलें. परमेश्वराच्या काळस्वरूपाची लीला ही अशी आहे ॥ ३७ ॥ हे कुरुश्रेष्ठा परीक्षित् राजा, सर्व सत्त्वगुणांचें माहेरघर अशा विश्वनियंत्या नारायणाच्या या लीलाकथा मीं तुला थोडक्यांत सांगितल्या· त्या पूर्णत्वानें सांगणें ब्रह्मदेवालाहि शक्य नाहीं ॥ ३८ ॥ राजा, हा संसारसमुद्र तरून जाण्यास अत्यंत कठीण असून त्याला पैलथडीला जावयास भगवान् श्रीविष्णूशिवाय दुसरी नौकाच सांपडावयाची नाहीं. मनुष्य अनेक दुःखांनीं पोळला असतां त्याला जर संसारसमुद्र उतरून जावयाचें असेल तर भगवंताच्या लीलाकथारूपी अमृताचें सेवन करणें हाच एक त्याला तरणोपाय होय ॥ ३९ ॥ ही श्रीमद्भागवतपुराणरूप संहिता अनाद्यनंत अशा श्रीनारायणऋषीनें पूर्वी नारदाला सांगितली व नंतर नारदानें ती कृष्णद्वैपायन व्यासांना सांगितली ॥ ४० ॥

हे परीक्षित् राजा, पुढें बदरिकाश्रमवासी भगवान् व्यासांनीं ही वेदतुल्य भागवतसंहिता संतुष्ट होऊन मला सांगितली ॥ ४१ ॥ आतां यापुढें नैमिषारण्यामध्यें शौनक आदिकरून ऋषि दीर्घकालीन सत्र चालू करून त्या प्रसंगीं सूताला प्रश्न करितील, त्या वेळीं, हे राजा, सूत त्या ऋषींना ही संहिता सांगणार आहे ॥ ४२ ॥

## चौथा अध्याय समाप्त

———

# अध्याय ५ वा

शुक्राचार्य सांगतात, हे परीक्षित् राजा, या भागवतसंहितेमध्यें विश्वाचा अंतर्यामी असा जो भगवान् श्रीहरि त्याचें गुणवर्णन सारखें आलें आहे. त्या भगवंताच्या प्रसन्नतेपासून ब्रह्मदेवाची उत्पत्ति झाली व त्याच्या क्रोधापासून रुद्रस्वरूपी शंकर जन्मास आला ॥ १ ॥ हे राजा, आतां तुझ्यासंबंधीं बोलावयाचें तर 'आपण आतां मरणार' ही जी पशूसारखी अडाणी समजूत ती तूं सोडून दे. तुझा देह जसा सांप्रत उत्पन्न झालेला आहे, पण पूर्वीं नव्हता, तसा तूं आज उत्पन्न झालेला आहेस असें नाहीं किंवा पूर्वीं नव्हतास असेंहि नाहीं. मग त्या देहाप्रमाणें तुझा नाश कसा होईल ? ॥ २ ॥

बीजांकुरन्यायानें तुझें शरीर, पुत्र आदिकरून वंशजांच्या शरिराच्या रूपानें जन्मास येऊन त्याचा लय होईल आणि अग्नि जसा काष्ठाहून निराळा असतो, तसा तूंहि देहादि उपाधींहून सर्वथैव भिन्न असल्यामुळें तुला जन्म किंवा मरण हें कसें असेल ? ॥ ३ ॥ पाहा कीं, स्वप्नामध्यें मनुष्य आपलेंच मस्तक छेदलेलें पाहतो किंवा आपल्याच देहाला मरण आलेलें पाहतो. यावरून ( तें पाहणारा मनुष्य त्या शरिराहून भिन्न आहे असें निष्पन्न होत नाहीं काय ? ) खरोखर आत्मा हा जन्मरहित व जरारहित आहे ॥ ४ ॥ घटामध्यें कोंडलेलें आकाश हें खरोखर आकाशच असून घट फुटल्यावर जसें आकाश आकाशांत एकवटतें तसाच प्रकार जीव व ब्रह्म यांचा आहे. देह नष्ट झाला म्हणजे मूळ ब्रह्मस्वरूपी जीव पुनः ब्रह्मच होतो ॥ ५ ॥ जीवासाठीं शरीर, इंद्रियें व त्यांचीं कार्यें हीं जीं उत्पन्न होतात, तीं मन उत्पन्न करितें. त्या मनाची उत्पत्ति माया करिते व त्यामुळें जीवाच्या मागें संसार चालू होतो ॥ ६ ॥ तेलाच्या आधारानें वात व अग्नि यांचा संबंध जोंपर्यंत आहे, तोंपर्यंतच दिव्याचा दिवेपणा असतो. देहोपाधीमुळें उत्पन्न झालेल्या जन्ममरणरूप संसाराचा तसाच प्रकार आहे. सत्त्व, रज व तम या गुणांच्या वृत्तींमुळें तो देह जन्मास येतो व नाश पावतो ॥ ७ ॥ त्यांत स्वयंप्रकाश अशा आत्म्याचा कांहीं संबंध नाहीं. कारण व्यक्त असलेला देह किंवा अव्यक्त असलेलीं इंद्रियें यांच्या तो अगदीं पलीकडचा आहे. तो आकाशाप्रमाणें सर्वांचा आधार असून, अचल आहे. त्याला अंत नाहीं व तो अमक्यासारखा आहे असेंहि सांगणें शक्य नाहीं ॥ ८ ॥ हे राजा, अंतःकरणांत वास करणाऱ्या अशा त्या आत्म्याचें मनानें नीट चिंतन कर. तो प्रत्यक्ष दिसणारा नसल्यामुळें योग्य अनुमान करण्यास शिकलेल्या व भगवच्चिंतन करणाऱ्या बुद्धीनेंच त्याचा विचार करणें शक्य आहे ॥ ९ ॥ ब्राह्मणाच्या शापवचनानें प्रेरणा केलेला तक्षक तुला जाळूं शकणार नाहीं. कारण काळाचाहि काळ असा जो ईश्वर त्याला कोणतेंहि मृत्युकारण जाळूं शकत नाहीं ॥ १० ॥ मी म्हणजेच परम पद असें ब्रह्म आणि परमपद ब्रह्म म्हणतात तें मीच होय,

अशा योग्य विचार निर्मल अशा अंतःकरणांत परमात्म्याची स्थापना करून तूं करीत रहा-शील, तर तक्षक सर्प आपल्या विषयुक्त मुखानें जरी तुला डसला, तरी तो, तसेंच तुझें शरीर व हें सारें विश्व हीं आत्म्याहून भिन्न आहेत असें तुला वाटणार नाहीं ॥ ११ ॥ १२ ॥ हे राजा, विश्वाचा अंतर्यामी अशा परमात्मा श्रीहरीच्या लीला तूं ज्या मला विचा-रिल्यास, त्या ह्या मीं तुला सांगितल्या; आतां यापुढें आणखी काय ऐकावें अशी तुझी इच्छा आहे तें सांग ॥ १३ ॥

**पांचवा अध्याय समाप्त**

———

# अध्याय ६ वा

सूत म्हणतो, हे शौनका ! सर्व भूतमात्रांवर आत्मदृष्टि ठेवून त्यांशीं समभावानें वागणाऱ्या व्यासपुत्र शुकाचार्यांनीं केलेला ब्रह्मोपदेश ऐकिल्यावर परीक्षितीनें त्यांच्या पायां-वर मस्तक ठेवलें आणि हात जोडून तो बोलूं लागला ॥ १ ॥

राजा परीक्षिति शुकाचार्यास म्हणाला, ' हे शुकमुने, आपली कृपादृष्टि मजवर झाल्यामुळें मी आतां परिपूर्ण झालों आहें; कारण आपण कृपाळू होऊन अनादि व अनंत अशा प्रत्यक्ष श्रीहरीचें गुणवर्णन माझ्याकडून ऐकविलें ॥ २ ॥ परमेश्वराच्या ठिकाणीं अंतःकरण लीन केलेल्या आपल्यासारख्या योग्यांची त्रिविध तापांनीं होरपळलेल्या माझ्या-सारख्या अज्ञानी प्राण्यावर दया होणें स्वाभाविकच आहे; त्यांत मला फारसें नवल वाटत नाहीं ॥ ३ ॥ आतां ही जी भागवतसंहिता मीं आपल्या मुखांतून ऐकिली, तींत पुण्यकीर्ति भगवंताची सर्व लीला सर्वत्र गायिलेली आहे ॥ ४ ॥ हे भगवन्, आतां मी तक्षका-सारख्या मृत्यु आणणाऱ्या कारणांना भीत नाहीं. मी आतां ब्रह्मनामक अत्यंत शांत अशा तत्त्वांत प्रविष्ट झालों आहें. आपण हें निर्भय असें स्थान मला दाखवून दिलें आहे ॥ ५ ॥ आतां, हे मुने, मला अनुज्ञा द्या, म्हणजे मीं इंद्रियांचा नियंता जो भगवान् परमात्मा त्याच्या ठिकाणीं वाणीचा निरोध करितों आणि अंतःकरणांतून सर्व वासनाबीज काढून व त्याला भगवत्स्वरूपीं स्थिर करून प्राणत्याग करितों ॥ ६ ॥ माझें अज्ञान नष्ट होऊन मी आतां ज्ञान व विज्ञान यांत स्थिर झालों आहें. कारण, परम कल्याणाचें माहेरघर असें भगवंताचें पद आपण मला दाखवून दिलें ' ॥ ७ ॥

सूत म्हणतो, हे शौनक मुने, याप्रमाणें परीक्षित् राजानें विनंति करून भगवान् शुकाचार्यांची पूजा केली व शुकाचार्यहि त्याला त्यानें मागितलेली अनुज्ञा देऊन ऋषींसह तेथून निघून गेले ॥ ८ ॥ नंतर राजश्रेष्ठ परीक्षितानें इंद्रियांसह आपलें चित्त आत्मस्वरूपीं लाविलें आणि वृक्षाचा बुंधा जसा निश्चल असतो, तसा तो प्राणांचें चलनवलन थांबवून परमात्म्याचें चिंतन करूं लागला ॥ ९ ॥

तो गंगेच्या तीरावर उत्तरेस तोंड करून पूर्वाभिमुख अशा दर्भाच्या आसनावर ब्रह्मस्वरूप होऊन बसला आणि उत्तम प्रकारचें योगसाधन करून सर्व संगापासून मुक्त झाल्यामुळें त्याचे सर्व संशयहि नष्ट झाले ॥ १० ॥

हे मुनि हो, इकडे असें झालें कीं, क्रुद्ध झालेल्या ऋषिपुत्राच्या प्रेरणेनें तक्षक सर्प परीक्षित् राजाला दंश करण्यासाठीं निघाला. तो येत असतां त्याला कश्यप नामक ब्राह्मण भेटला ॥ ११ ॥ हा ब्राह्मण विष उतरण्यांत कुशल होता; पण तक्षकानें त्याला द्रव्य

देऊन मागें लावून दिलें आणि इच्छेस येईल तें रूप घेण्याचें सामर्थ्य त्याला असल्यामुळें त्यानें ब्राह्मणाचें रूप घेतलें व परीक्षित् राजाजवळ येऊन त्याला दंश केला ॥ १२ ॥ त्याबरोबर ब्रह्मस्वरूप झालेल्या राजश्रेष्ठ परीक्षिताचा देह त्या सर्पविषाच्या आगीमुळें, सर्व मंडळी पाहत असतां तात्काळ भस्म होऊन गेला ॥ १३ ॥ तो प्रकार पाहून पृथ्वी, अंतरिक्ष, दिशा अशा सर्व ठिकाणीं मोठा हाहाःकार झाला आणि देव, दानव, मनुष्य इत्यादि सर्व आश्चर्यानें चकित होऊन गेले ॥ १४ ॥ देवांनीं आपल्या दुंदुभि वाजविल्या, गंधर्व व अप्सरा यांनीं गायन केलें आणि 'उत्तम उत्तम' असें म्हणत देवांनीं फुलांचा वर्षाव केला ॥ १५ ॥ नंतर परीक्षिताचा पुत्र जनमेजय यास—आपल्या पित्यास तक्षकानें दंश करून भस्म केलें—असें जेव्हां समजलें, तेव्हां फार राग आला. त्यानें ब्राह्मणांकडून यथाविधि सर्पयज्ञ करून त्यांत नागांचें हवन केलें ॥ १६ ॥ तें सर्पसत्र चाललें असतां भडकलेल्या अग्नींत मोठे मोठे सर्प पडून खाक होत आहेत असें तक्षकाच्या दृष्टीस पडतांच तो अगदीं घाबरून जाऊन इंद्राला शरण गेला ॥ १७ ॥ सर्व सर्प अग्नींत येऊन पडतात, पण तो नीच तक्षक मात्र अद्याप अग्नींत येऊन पडत नाहीं, असें पाहून राजा ब्राह्मणांना म्हणाला, 'हे ब्राह्मण हो, तो अत्यंत नीच तक्षक सर्प अद्याप कसा येत नाहीं?' ॥ १८ ॥ ब्राह्मणांनीं उत्तर केलें, 'राजा, तो इंद्राला शरण गेल्यामुळें इन्द्र त्याचें रक्षण करीत आहे; तेव्हां इंद्रानें अडविल्यामुळें तो यज्ञाग्नींत येऊन पडत नाहीं' ॥ १९ ॥ खोल बुद्धीच्या जनमेजयानें यज्ञ करणाऱ्या ब्राह्मणांचें हें म्हणणें ऐकून तो त्यांस म्हणाला, 'ब्राह्मण हो, असें आहे तर इंद्रासह तक्षकाला तुम्ही अग्नींत आणून कां पाडीत नाहीं?' ॥ २० ॥ जनमेजयाचें म्हणणें ऐकून ब्राह्मणांनीं इन्द्रासहित तक्षकाचें हवन यज्ञांत करावें असें ठरविलें आणि 'तक्षका, मरुतांचा अधिपति अशा इंद्रासह तूं त्वरित या अग्नींत येऊन पड!' अशा अर्थाच्या मंत्रानें आहुति सोडली ॥ २१ ॥ ब्राह्मणांनीं उच्चारिलेल्या मंत्राच्या शक्तीमुळें इंद्र आपल्या स्थानापासून चळला व तक्षकासह त्याचें विमान हालूं लागलें. तो मनांत घाबरून गेला ॥ २२ ॥ इंद्राच्या विमानासह तक्षक खालीं पडूं लागला हें पाहतांच अंगिरसपुत्र बृहस्पति जनमेजय राजाला म्हणाला, 'हे राजा, या सर्पराज तक्षकाचा तुझ्या हातून वध होणें शक्य नाहीं. यानें अमृताचें पान केलें असून त्यामुळें तो अजर व अमर झाला आहे ॥ २३ ॥ २४ ॥ हे राजा, जगणें किंवा मरणें, यांसारख्या अवस्था प्राण्याला स्वतःच्याच कर्मानें प्राप्त होत असतात. सुख व दुःख हीं कोणालाहि दुसऱ्यापासून प्राप्त होत नाहींत ॥ २५ ॥ सर्प, चोर, अग्नि, वीज, तसेंच भूक, तहान, रोगराई इत्यादिकांमुळें प्राण्याला मरण येतें, म्हणजे तो आपलें प्रारब्ध कर्माचें फळच भोगितो ॥ २६ ॥ राजा, यास्तव तूं हें घातक सर्पसत्र बंद कर; कारण, आतांपर्यंत यांत निरपराधी सर्पच दग्ध झाले आहेत (पण त्यांत तुझा अपराध नाहीं). कोणी झालें तरी दैवांत असेल तेंच भोगीत असतें. ॥ २७ ॥

सूत म्हणतो, हे शौनक मुने, बृहस्पतीनें असें सांगितलें असतां त्या महर्षींच्या वचनाला मान देऊन जन्मेजयानें 'ठीक आहे' असें म्हटलें आणि सर्पसत्र बंद करून बृहस्पतीची पूजा केली ॥ २८ ॥ श्रीविष्णूची अनिर्वचनीय महामाया म्हणतात ती ही अशी आहे. ती त्रिकालींहि बाधित होणारी नसून तिच्यामुळें परमात्म्याचेच अंशभूत असे जीव इंद्रियांच्या वृत्तींनीं गुरफटून जाऊन मोह पावतात ॥ २९ ॥ पुरुष हा मायायुक्त आहे खरा; पण आत्मज्ञानी पुरुषांचें आत्मस्वरूपविषयक विवेचन एकदां चालू झालें म्हणजे, त्या मायेला निर्भयपणें वावरतां येत नाहीं. कारण, आत्मस्वरूपामध्यें मायाविषयक निरनिराळ्या प्रकारच्या विवेचनाला जागाच नसते व संकल्पविकल्पात्मक असें जें मन तेंहि तेथें नसतें ॥ ३० ॥ त्या आत्मस्वरूपामध्यें उत्पन्न करावयाचें असें कांहीं नसतें व उत्पन्न करणाराहि कोणी नसतो. हे दोन व त्या उभयतांच्या पलीकडे असलेलें जें परम कल्याण, तें, या तिघांनीं युक्त असा जे अहंकारयुक्त जीवात्मा तोहि तेथें नसतो. त्या त्रिकाळीं बाधित होणारें व बाधित करणारें हीं दोन्ही नष्ट झालेलीं असतात. म्हणून इंद्रियांच्या लाटांचा त्याग करून पुरुषानें विचारशील व्हावें व विषयभोगांपासून अलिप्त राहावें ॥ ३१ ॥ त्या परमश्रेष्ठ अशा स्थानाला श्रीविष्णूचें स्थान असें म्हणतात. आत्मव्यतिरिक्त वस्तूंचा त्याग करण्याची इच्छा करणारे पुरुष 'अमुक हें आत्मा नव्हे, तमुक हें आत्मा नव्हे' असें विवेचन करितात आणि देहात्मवादासारख्या दोषयुक्त विचारांचा त्याग करून त्या एका आत्मस्वरूपींच प्रेम ठेवितात. ते त्या आत्मस्वरूपाला हृदयाशीं कवटाळून निश्चल केलेल्या अंतःकरणाच्या साहाय्यानें त्याचें निश्चित ज्ञान करून घेतात ॥ ३२ ॥ ज्या पुरुषांच्या अंतःकरणांत देहगेहादिकांविषयीं 'मी व माझें' असा दोषयुक्त विचार नसतो, त्या पुरुषांनाच या परमश्रेष्ठ अशा श्रीविष्णूच्या स्थानाची प्राप्ति होते ॥ ३३ ॥ यास्तव कोणाचाहि अपमान न करतां त्याचे अतिरिक्त दुष्ट शब्दहि सहन करावे आणि या देहाच्या अभिमानानें कोणाशींहि वैर करूं नये ॥ ३४ ॥ ज्या तीव्र बुद्धीच्या भगवान् कृष्णद्वैपायन गुरूंच्या पदकमलांचें ध्यान केल्यामुळें मला या भागवतसंहितेचा लाभ झाला त्यांना माझा नमस्कार असो ॥ ३५ ॥

शौनक ऋषि म्हणतात, हे सूता, व्यास मुनींचे पैल आदिकरून जे शिष्य होते ते महात्मे वेदांचे आचार्य म्हणून प्रसिद्ध आहेत. तरी आचार्यांनीं वेदांचे कसे कसे भाग केले हें आम्हांला कृपा करून सांगावें ॥ ३६ ॥

सूत म्हणतो, हे मुनि हो, परमश्रेष्ठ पदावर अधिष्ठित झालेला जो ब्रह्मदेव तो मन निश्चल करून बसला असतां त्याच्या हृदयाकाशांतून शब्द उत्पन्न झाला. आपणहि इंद्रियाच्या वृत्ति बंद करून ऐकूं लागल्यास तो आपल्याला ऐकूं येतो ॥ ३७ ॥ हे मुने, त्या शब्दब्रह्माची उपासना करून योगी लोक द्रव्य, कर्म व कारक म्हणजे भौतिक, आध्यात्मिक व आधिदैविक असा तिन्ही प्रकारचा मल धुऊन टाकून मोक्षपदाला प्राप्त होतात ॥ ३८ ॥ असो. त्या शब्दब्रह्मापासून 'अ, उ, म्' या तीन वर्णांनीं युक्त असा

ॐकार उत्पन्न झाला. या ॐकाराचें उत्पत्तिस्थान अव्यक्त असून तो स्वयंप्रकाशित आहे. हें जें ॐकाररूप शब्दब्रह्म तें सर्वैश्वर्यसंपन्न अशा परब्रह्माचें लक्षण होय ॥ ३९ ॥ श्रोत्रेन्द्रिय सुप्तावस्थेंत असतांना दृष्टि शून्य करून ब्रह्मदेव हें नादब्रह्म श्रवण करितो. या नादब्रह्मापासून वाणी व्यक्तरूपाला येते व हा शब्द आत्म्यापासून आकाशाच्या ठिकाणीं प्रादुर्भूत होतो ॥ ४० ॥ स्वयंप्रकाश अशा परब्रह्माचा हा ॐकाररूप शब्द वाचक असून त्रिकालाबाधित अशा सर्व वेदांचें व उपनिषदांचें रहस्य आहे ॥ ४१ ॥ हे शौनकमुने ! त्या ॐकाराचे अकार, उकार व मकार असे तीन वर्ण होते व त्या तीन वर्णांच्या योगें सत्त्व, रज व तम हे गुण, ऋग्, यजुः व साम हे वेद, तसेच भूः भुवः व स्वः हे लोक आणि जाग्रत, स्वप्न व सुषुप्ति या अवस्था अशा तीन तीन पदार्थांचें धारण होतें ॥ ४२ ॥ या ॐकारापासून ब्रह्मदेवानें अक्षरांच्या विशिष्ट रचनेनें होणारें शब्दशास्त्र निर्माण केलें. या अक्षरसमुदायांत अन्तस्थ ऊष्म, स्वर, स्पर्श, ऱ्हस्व, दीर्घ इत्यादि भेद व पोटभेद आहेत ॥ ४३ ॥

या अक्षरसमुच्चयाच्या साहाय्यानें भगवान् ब्रह्मदेवानें आपल्या पुत्रांना चारी तोंडांनीं चार वेद, व्याहृति व ॐकार हीं पढविलीं. चारी वेदांच्या योगानें होणाऱ्या यज्ञानुष्ठानाचें नीट विवरण करावें, असा ते पढविण्यांत ब्रह्मदेवाचा हेतु होता. त्याचे पुत्र ब्रह्मज्ञानी ऋषिच होते व पुढें धर्माचे उपदेशक होऊन त्यांनीहि आपल्या पुत्रांना वेदांच, उपदेश दिला ॥ ४४,४५ ॥ अशा परंपरेनें चारी युगांत शिक्षणाचें व्रत घेतलेल्या शिष्यांकडून शिष्यांना मिळतां मिळतां ते द्वापरयुगारंभीं जेव्हां व्यासांना मिळाले, तेव्हां व्यासांनीं त्यांची निराळी व्यवस्था केली ॥ ४६ ॥

कालमाहात्म्यामुळें लोक अल्पायुषी, अल्पबळ व अल्पबुद्धि झालेले पाहून ब्रह्मर्षींच्या मनांत अंतर्यामिरूपानें वागणाऱ्या परमेश्वरानें प्रेरणा केली व त्या प्रेरणेनुसार ब्रह्मर्षींनीं वेदांचे विभाग केले ॥ ४७ ॥ हे शौनक मुने, या वैवस्वत मन्वंतरामध्यें ब्रह्मदेव, शंकर इत्यादि देवांनीं व इंद्रादि लोकपालांनीं लोकरक्षक भगवंताची धर्मरक्षणार्थ प्रार्थना केली ॥ ४८ ॥ हे भाग्यशाली मुने, त्या विंनतीप्रमाणें परमेश्वरानें आपल्या लहानशा अंशानें पराशर मुनीचा पुत्र म्हणून सत्यवतीच्या पोटीं अवतार घेतला व एका वेदाचे चार प्रकार केले ॥ ४९ ॥ रत्नांच्या राशींतून निरनिराळ्या जातींचीं रत्नें वेगवेगळीं करून त्यांचे वर्ग बनवावे, त्याप्रमाणें ऋक्, यजु, साम अशा विविध प्रकारच्या मंत्रांनीं बनलेल्या वेदांच्या राशींतून व्यासानें निरनिराळ्या प्रकारचे मंत्र वेगवेगळे काढून × त्यांच्या चार संहिता केल्या ॥ ५० ॥ हे शौनक मुने ! मग त्या विशाल बुद्धीच्या समर्थ मुनीनें आपल्या चार शिष्यांना बोलावून त्या चार संहितांतील एक एक संहिता

---

× ऋग् मंत्र म्हणजे देवांची स्तुति गाणारे, त्यांची प्रार्थना करणारे किंवा त्यांचे पराक्रम वर्णन करणारे मंत्र होत. यजुःमंत्र म्हणजे यज्ञकर्मांचें वर्णन करणारे मंत्र होत, साम-मंत्र म्हणजे गाण्याच्या सोईचे मंत्र होत.

एकेकाला पढविली ॥ ५१ ॥ पहिली बरच अथवा ऋग्वेदसंहिता; ही त्यानें पैल नामक शिष्यास पढविली. दुसरी यजुर्मंत्रांची निगद नांवाची संहिता, ही त्यानें वैशंपायन नामक शिष्याला सांगितली ॥ ५२ ॥ साममंत्रांची छंदोग नामक संहिता त्या मुनीनें जैमिनि नांवाच्या शिष्याला शिकविली व सुमन्तु नांवाच्या आपल्या चौथ्या शिष्याला आंगिरसी म्हणजे अथर्वसंहिता ही पढविली ॥ ५३ ॥ पुढें पैल मुनीनें ती आपली ऋग्वेदसंहिता इंद्रप्रमिति नामक शिष्याला व तशीच बाष्कल नांवाच्या दुसऱ्याहि शिष्याला पढविली आणि बाष्कलानें पुढें ती आपल्या शिष्यांना सांगितली ॥ ५४ ॥ हे शौनकमुने ! बाष्कलानें त्या संहितेची चतुर्विध रचना करून बोध्य, याज्ञवल्क्य, पराशर व अग्निमित्र या चार शिष्यांना पढविली. इंद्रप्रमिति हा आत्मज्ञानी होता. त्यानें आपली संहिता ज्ञानी अशा मांडूकेय ऋषीला शिकविली व पुढें मांडूकेयाचा शिष्य देवमित्र यानें ती सौभरि आदि करून ऋषींना सांगितली ॥ ५५ ॥ ॥ ५६ ॥ सौभरीचा पुत्र शाकल्य यानें आपण पढलेल्या संहितेची पांच भागांत पुनर्रचना करून ती वात्स्य, मुद्गल, शालीय, गोखल्य आणि शिशिर या शिष्यांना पढविली ॥ ५७ ॥ शिशिराचा शिष्य जातुकर्ण्य नांवाचा ऋषि होता, त्यानें आपली संहिता निरुक्तासह बलाक, पैज, वैताल व विरज यांना शिकविली ॥ ५८ ॥ बाष्कलि नामक ऋषीनें या संहितेच्या निरनिराळ्या शाखांतून मंत्र निवडून त्यांची वालखिल्य नांवाची संहिता रचिली. या नवीन संहितेचा स्वीकार बालायनि, भज्य आणि कासार या तिघांनींच केला ॥ ५९ ॥ अशा या बह्वृच संहितेच्या म्हणजे ऋग्वेदसंहितेच्या शाखा असून या ब्रह्मर्षींनीं त्यांची परंपरा चालविली. वेदाच्या संहितारचनेचा हा इतिहास जो श्रवण करील तो सर्व पापांपासून मुक्त होईल ॥ ६० ॥ यजुःसंहितेचा पहिला पाठक जो वैशंपायन त्याचे चरकाध्वर्यु नांवाचे शिष्य होते, त्यांनीं आपल्या गुरूच्या ब्रह्महत्येच्या पातकाचें निरसन करण्यासाठीं त्याच्या सांगण्यावरून व्रत आचरण केलें होतें ॥ ६१ ॥ वैशंपायनाचा शिष्य याज्ञवल्क्य यानें पुढें होऊन गर्वानें सांगितलें, ‘ गुरुजी, हे इतर शिष्य दुबळे आहेत. त्यांनीं व्रताचरण करून काय होणार ? यास्तव तुम्हीं सांगितलेलें हें कठीण व्रत मीच करतों ’ ॥ ६२ ॥

ही याज्ञवल्क्याची दर्पोक्ति ऐकून वैशंपायनास राग आला आणि तो याज्ञवल्क्याला म्हणाला, ‘ पुरे झाला तुझा संबंध ! तूं येथून चालता हो ! माझा शिष्य असतां तूं ब्राह्मणांचा अपमान केलास त्या अर्थीं माझ्यापाशीं जें कांहीं शिकलास तें सर्व या क्षणीं टाकून दे ! ॥ ६३ ॥ याज्ञवल्य हा देवरात नामक ऋषीचा पुत्र होता. त्यानें गुरूच्या सांगण्याप्रमाणें तत्काल यजुःसंहिता ओकून टाकिली आणि तो तेथून निघून गेला. तो गेल्यावर इतर ऋषींनीं तीं यजुःसंहितेचीं सर्व टाकून दिलेलीं वचनें पाहिलीं ॥ ६४ ॥ त्यांच्याविषयीं त्या ऋषींना फार लोभ वाटला आणि त्यांनीं तित्तिर पक्ष्यांचीं रूपें घेऊन तीं चाटून घेतलीं. या वृत्तांतावरून त्या सुंदर अशा यजुःसंहितेला पुढें तैत्तिरीय संहिता असें म्हणूं लागले ॥ ६५ ॥ हे शौनक मुने, याज्ञवल्क्य तेथून गेल्यावर तो वेदमंत्रांचा शोध

करूं लागला. त्याला आपल्या गुरूपाशीं नसलेले असे नवीन वेदमंत्र पाहिजे होते. त्यासाठीं त्यानें सूर्याची उत्तम आराधना केली ॥ ६६ ॥ आराधना करतांना याज्ञवल्क्य म्हणाला, ' भगवान् आदित्याला नमस्कार असो. तो भगवान् सूर्यनारायण सर्व जगतांचा व्यवहार चालविण्यासाठीं पाण्याचें प्रथम आकर्षण करून नंतर तें पर्जन्यरूपानें सोडून देतो तो चारी प्रकारच्या जीवयोनींच्या म्हणजे ब्रह्मदेवापासून तों गवतापर्यंत सर्वांच्या अंतःकरणांत आत्मस्वरूपानें वास करितो. तसाच तो काळस्वरूपानें त्या सर्वांच्या बाहेरहि पाहतो; पण कोणत्याहि उपाधीनें तो ग्रासला जात नाहीं. क्षण, लव, निमेष इत्यादि भागांनीं बनलेल्या संवत्सराच्या चक्राच्या साहाय्यानें तो एकटाच सर्व जगांचा व्यवहार चालवितो ॥ ६७ ॥ हे देवश्रेष्ठा सवित्या, प्रतिदिवशीं सकाळ-संध्याकाळ जे कोणी वेदविहित मार्गानें तुझी उपासना करितात, त्यांच्या सर्व पापांचें व संकटांचें बीज तूं आपल्या तेजानें जाळून टाकितोस हे भगवन् ! तुझें जें हें तेजोयुक्त मंडळ आकाशांत तळपत आहे, त्याचें आम्ही मनःपूर्वक ध्यान करितों ॥ ६८ ॥ हे सूर्यदेवा, सर्व स्थावरजंगम वस्तूंचे समुदाय तुझींच स्थानें होत. त्या सर्वांचीं मनें, इंद्रियें व प्राण हे चैतन्यविरहित असल्यामुळें तूं स्वतः त्यांचा अंतर्यामी होऊन त्यांना योग्य ती प्रेरणा करितोस ॥ ६९ ॥

हे अत्यंत दयाळु अशा सूर्यनारायणा, हें सर्व जग अत्यंत भयंकर मुखाच्या अज्ञान नामक अजगरानें गिळून टाकिल्यामुळें मेल्यासारखें निश्चेष्ट पडलेलें पाहून तुला फार दया येते. म्हणून त्याला आपल्या कृपाकटाक्षानें उठवून आत्मज्ञानरूपी परम कल्याणाचें स्वधर्म नामक जें साधन तें साधण्याविषयीं तूं त्याला सकाळ-संध्याकाळ प्रवृत्त करितोस. तसेंच तूं राजाप्रमाणें दुष्टांचें पारिपत्य करीत भ्रमण करितोस ॥ ७० ॥ हें तुझें भ्रमण चाललें असतां सर्व दिक्पाळ ठिकठिकाणीं तुझें स्वागत करून आपल्या कमलाच्या कळ्यासारख्या ओंजळींतून आणिलेलीं पूजाद्रव्यें तुला अर्पण करितात ॥ ७१ ॥

यास्तव हे भगवन् सूर्यनारायणा, त्रिभुवनाचे निर्माते असे जे ब्रह्मदेवादिक थोर पुरुष तेहि ज्याला वंदन करितात, त्या तुझ्या चरणकमलाला मी शरण आलों आहें; कारण कोणाच्याहि तोंडीं राहून शिळे झालेले नाहींत असे नवीन यजुर्मंत्र मला पाहिजे आहेत ' ॥ ७२ ॥

सूत म्हणतो, हे शौनक मुने ! याप्रमाणें याज्ञवल्क्यानें भगवान् सूर्यनारायणाचा स्तव केला असतां तो देव प्रसन्न झाला व वाजीचें म्हणजे घोड्याचें रूप घेऊन त्यानें त्या ऋषीला अगदीं नवीन असे यजुर्मंत्र दिले ॥ ७३ ॥ त्या समर्थ याज्ञवल्क्याला हे जे शेंकडों यजुर्मंत्र मिळाले त्यांच्या त्यानें पंधरा शाखा केल्या. या शाखांना ' वाजसनी ' शाखा म्हणतात. त्यांचा काण्व, माध्यंदिन इत्यादिकांनीं स्वीकार केला ॥ ७४ ॥ असो. जैमिनि हा जो सामगायक, त्याचा पुत्र सुमन्तु नामक ऋषि होता व त्या सुमन्तूचा पुत्र सुन्वान् नामक होता. त्या दोघांना जैमिनीनें एकएक सामसंहिता पढविली ॥ ७५ ॥ पुढें त्याच्या सुकर्मा नामक थोर ब्राह्मणशिष्यानें त्या सामवेदरूप वृक्षाच्या एक सहस्र शाखा

केल्या ॥ ७६ ॥ त्या सुकर्म्याचे कौशल्यगोत्री हिरण्यनाभ व पौष्यंजि असे शिष्य होते; तसाच उत्तम ब्रह्मवेत्ता असा आवन्त्य नांवाचा आणखीहि एक शिष्य होता. त्या शिष्यांनीं सामवेदाच्या शाखांचा स्वीकार केला ॥ ७७ ॥

यांतील पौष्यंजि व आवन्त्य या सामवेदाचार्यांचे सामवेद पढणारे पांचशें शिष्य होते; ते उदीच्य म्हणजे उत्तरेकडील असतांहि त्यांना प्राच्य म्हणजे पूर्वेकडील असें म्हणतात ॥ ७८ ॥ पौष्यंजीच्या शिष्यांमधील लौगाक्षि, मांगलि, कुल्य, कुशीद व कुक्षि या शिष्यांनीं प्रत्येकीं शंभर सामसंहितांचा अभ्यास केला ॥ ७९ ॥ हिरण्यनाभाचा शिष्य कृत नांवाचा होता. त्यानें आपल्या शिष्यांना चोवीस संहिता पढविल्या. यानंतर उरलेल्या ज्या सामवेदाच्या शाखा त्या आत्मज्ञानी आवन्त्यानें इतर शिष्यांना सांगितल्या ॥ ८० ॥

सहावा अध्याय समाप्त

———

# अध्याय ७ वा

सूत म्हणतो, हे शौनक मुने, अथर्ववेदाचा आचार्य जो सुमन्तु त्यानें आपली अथर्वसंहिता कबंध नामक आपल्या शिष्याला पढविली व कबंधानें पुढें ती पथ्य आणि वेददर्श यांना सांगितली ॥ १ ॥ शौक्लायनि, ब्रह्मबलि, मोदोष व पिप्पलायनि असे वेददर्शाचे शिष्य होते. आतां पथ्याचे शिष्य कोण होते तें ऐका. हे शौनक मुने ! कुमुद, शुनक आणि अथर्ववेदवेत्ता जाजलि हे ते शिष्य होत ॥ २ ॥ त्यांत अंगिरसकुलोत्पन्न शुनकाचे बभ्रु आणि सैन्धवायन असे दोन शिष्य होते. त्यांनीं अथर्ववेदाच्या दोन संहितांचें पठन केलें. तसेंच इतरांनीं म्हणजे सावर्ण्य आदिकरून सैन्धवायनाच्या शिष्यांनींहि केलें ॥ ३ ॥ अथर्ववेदाचे नक्षत्रकल्प, शांतिकल्प, वेदकल्प, संहिताकल्प व अंगिरसकल्प असे पोटभेद असून त्यांचा कश्यप, अंगिरस् इत्यादिकांनीं स्वीकार केला व त्यामुळें त्यांना त्या शाखांचे आचार्य म्हणतात. असे हे अथर्ववेदाचे आचार्य होत. आतां हे शौनक मुने, पुराणवेत्ते कोण कोण झाले तें ऐका ॥ ४ ॥ त्रैयारुणि, कश्यप, सावर्णि, अकृतव्रण, वैशंपायन व हारीत हे सहा पहिले पुराणांचे होत ॥ ५ ॥

व्यासांचा शिष्य जो माझा पिता त्याच्यापाशीं त्यांनीं एकेका पुराणसंहितेचें अध्ययन केलें. मीं त्या सर्वांचा शिष्य असल्यामुळें सर्वहि पुराणसंहितांचा मीं अभ्यास केला ॥ ६ ॥ कश्यप, मी, सावर्णि व परशुरामाचा शिष्य अकृतव्रण अशा चौघांनीं व्यासांच्या शिष्यापासून चार मूळ संहिता पठण केल्या ॥ ७ ॥ हे शौनक मुने; आतां ब्रह्मर्षींनीं स्वतःच्या बुद्धीचा उपयोग करून व वेदशास्त्रांचाहि आधार घेऊन पुराणांचें जें लक्षण ठरविलें आहे तें सांगतों, ऐका ॥ ८ ॥ या विश्वाच्या मूळ द्रव्यांची उत्पत्ति, त्या द्रव्यापासून होणाऱ्या विविध सृष्टीची उत्पत्ति, सृष्टीच्या उपजीविकेचीं साधनें, तिचें रक्षण, मन्वंतरें, राजवंश, त्या वंशांतील पुरुषांचे पराक्रम, प्रलय, वासना व मोक्ष यांचीं वर्णनें हा पुराणांचा विषय होय ॥ ९ ॥ या दहा प्रकारच्या वर्णनांनीं युक्त असें जें असतें त्याला तज्ज्ञ लोक ' पुराण ' असें म्हणतात. हे शौनक मुने, या लक्षणांत न्यूनाधिक व्यवस्था करून कित्येक जण दहांच्या स्थानीं पुराणांचीं पांच लक्षणेंहि मानितात ॥ १० ॥ अव्यक्त अशी जी प्रकृति तिच्या सत्त्व, रज व तम या तीन गुणांची साम्यावस्था बिघडून त्यांपासून महान् नामक तत्त्व उत्पन्न होतें व त्या महतापासून सात्त्विक, राजस व तामस या तीन प्रकारांनीं युक्त असा अहंकार होतो. पुढें अहंकारापासून पंच भूतांचीं सूक्ष्म स्वरूपें व रूप, रस इत्यादि इंद्रियांचे विषय उत्पन्न होतात- प्रकृतीपासून होणाऱ्या येथपर्यंतच्या तत्त्वांच्या उत्पत्तीला सर्ग असें म्हणतात ॥ ११ ॥

पुरुषानें या प्रकृतीपासून झालेल्या तत्त्वांवर कृपा केली म्हणजे त्यांच्यापासून वासना नांवाचा संस्कार होतो व त्याच्या योगें बीजापासून दुसरें बीज अशी परंपरा चालू होऊन स्थावर–जंगम सृष्टि बनते. या विविध स्थावरजंगमात्मक सृष्टीच्या उत्पत्तीला विसर्ग असें नांव आहे ॥ १२ ॥ या विविध सृष्टींतील जंगम भूतांच्या उपजीविकेचें साधन स्थावर भूतें असें स्वभावतः ठरलें असून, मनुष्यप्राण्यांमध्यें तें साधन स्वभावतः इच्छेनुसार किंवा कांहीं बाह्य प्रेरणेमुळेंहि ठरविलें जातें. या वर्णनाला वृत्ति असें म्हणतात ॥ १३ ॥ सृष्टीच्या रक्षणासाठीं परमेश्वराचा प्रतियुगामध्यें अवतार घेण्याचा विचार ठरतो व तो त्याप्रमाणें पशु, मनुष्य किंवा देव या योनींमध्यें अवतरून वेदद्वेष्ट्या नास्तिकांचा नाश करितो. हें वर्णन म्हणजे रक्षानामक भाग होय ॥ १४ ॥

या अवतारांच्या प्रसंगीं त्याला साहाय्य करणारीं सहा अंगें असतात. तीं मनु, देव, मनुपुत्र, देवांचा राजा, ऋषि व परमेश्वराचा अंशावतार हीं होत. हीं सहाही ज्या वेळीं स्वाधिकारप्रवृत्त असतात त्या काळाला 'मन्वंतर' असें म्हणतात ॥ १५ ॥

ब्रह्मदेवापासून तिन्ही काळीं जी राजांच्या कुळांची उत्पत्ति ती वंश होय. या राजांनीं व त्यांचीं कुळें चालविणाऱ्या संततींचें वर्णन म्हणजे वंशानुचरित होय ॥ १६ ॥ या सृष्टीचा निसर्गाच्या नियमाप्रमाणें चार प्रकारचा प्रलय होत असतो. नैमित्तिक, प्राकृतिक, नित्य आणि आत्यंतिक असे ते चार प्रकार होत. या प्रलयवर्णनाला संस्था हें नांव ज्ञात्यांनीं दिलें आहे ॥ १७ ॥

अज्ञानामुळें कर्म करण्यास प्रवृत्त झालेला जो जीवात्मा तोच या सृष्टीच्या उत्पत्तीचें कारण होय; पण कोणी सर्वान्तर्यामी परमात्म्यालाच तें कारण समजतात, तर कित्येक अव्यक्त प्रकृति हीच तें कारण होय असें मानितात. या विवेचनाला हेतु म्हणतात ॥ १८ ॥ जाग्रदवस्था, स्वप्नावस्था व सुषुप्ति म्हणजे गाढनिद्रारूप अवस्था या जीवात्म्याच्या वृत्ति असून त्या मायेनें निर्मिलेल्या आहेत. जीवात्म्याच्या या वृत्तींमध्यें ज्याचा त्याच्याशीं अन्वयव्यतिरेक संबंध असतो, म्हणजे जेथें जीवात्मा आहे तेथें जें नित्य आहेच व जें नसेल तर जीवात्माहि नाहीं, असें ब्रह्म जीवाच्या वृत्तींना आधारभूत आहे. ब्रह्माच्या या स्वरूपवर्णनाला व्यपाश्रय असें म्हणतात ॥ १९ ॥ ज्याप्रमाणें भिन्न दिसणाऱ्या वस्तूंमध्यें मूलद्रव्य ओतप्रोत भरलेलें असून बाहेरहि असतें अथवा रूपें व नामें यांत ज्याप्रमाणें आस्तित्व मात्र भरलेलें असून त्या बाहेरहि असतें, त्याप्रमाणें तें ब्रह्म सर्वांच्या उत्पत्ती-पासून अंतापर्यंतच्या अवस्थांमध्यें अंतर्भूत असून आणखी वेगळेंहि आहेच ॥ २० ॥ जाग्रदादि तीन अवस्थांच्या पलीकडे जाऊन चित्त जेव्हां आपण होऊन विराम पावतें किंवा योगसाधनानें विराम पाववें तेव्हां पुरुष आत्मस्वरूप ओळखूं लागतो व त्यामुळें वासनांपासून तो परावृत्त होतो ॥२१॥ असो. अशा या लक्षणांनीं युक्त अशीं अठरा लहान-मोठीं पुराणें प्राचीन विद्यावेत्त्या ऋषींनीं सांगितलेलीं आहेत ॥ २२ ॥ ब्रह्मपुराण,

पद्मपुराण, विष्णुपुराण, शिवपुराण, लिंगपुराण, गरुडपुराण, नारदपुराण, भागवतपुराण, अग्निपुराण, स्कंदपुराण, भविष्यपुराण. ब्रह्मवैवर्तपुराण, मार्कंडेयपुराण, वामनपुराण, वराहपुराण, मत्स्यपुराण, कूर्मपुराण, ब्रह्मांडपुराण अशीं तीं अठरा पुराणें होत ॥ २३-२४ ॥ सूत म्हणाले, हे शौनक मुने, व्यासमुनींनीं व त्यांच्या शिष्योप शिष्यांनीं केलेल्या वेदांच्या शाखांच्या रचनेचें वृत्त हें मीं तुम्हांला सांगितलें आहे. हें ऐकिल्यानें श्रोत्याचें ब्रह्मतेज वृद्धिंगत होतें ॥ २५ ॥

सातवा अध्याय समाप्त

———

# अध्याय ८ वा



शौनक ऋषि म्हणतात, हे सूता, तुला दीर्घ आयुष्य असो. तूं वक्त्यांमध्यें श्रेष्ठ आहेस तरी आम्ही विचारितों तें आम्हांला सांग. अपार अशा अज्ञानसागरांत भ्रमण करणाऱ्या पुरुषांना तूं परतीर दाखविणारा आहेस ॥ १ ॥ मृकण्ड ऋषीचा पुत्र मार्कंडेय हा चिरंजीव आहे असें लोक सांगतात. एकदां प्रलय होऊन त्यांत हें सर्व जग नष्ट झालें असतां तो एकटाच जिवंत राहिला असेंहि म्हणतात ॥ २ ॥ हा मार्कंडेय मुनि आमच्याच भार्गव कुळांतील श्रेष्ठ पूर्वज म्हणून या चालू कल्पांत प्रसिद्ध आहे; पण या कल्पांत सृष्टि-प्रलय कांहीं केव्हांहि झालेला नाहीं ॥ ३ ॥ तसेंच आणखी असें सांगतात कीं, सर्वत्र एकच एक सागर होऊन गेला असतां त्यांत भ्रमण करीत राहिलेल्या त्या मुनीला एक पुरुष दिसला. तो [illegible] असून मोठा विलक्षण होता व त्यानें वडाच्या पानाच्या द्रोणांत शयन केलें होतें ॥ ४ ॥ आतां या सर्व गोष्टींचें काय रहस्य आहे, हें आम्हांला कांहीं समजत नाहीं; त्याविषयीं आम्हांला शंका आहे व ती निरसन करून घेण्याची उत्कंठाहि आहे. तुला सर्व पुराणांचें ज्ञान आहे. तरी हे योगिश्रेष्ठा सूता, या आमच्या संशयाचें निराकरण कर ॥ ५ ॥

सूत म्हणतो, हे महर्षे, तुम्हीं जो हा प्रश्न केला, त्याच्या उत्तरानें सर्व लोकांचाहि भ्रम दूर होणारा आहे. कारण त्यांत कलिदोषाचा नाश करणाऱ्या भगवंताच्या कथाच गायिलेल्या आहेत ॥ ६ ॥ असो. मार्कंडेय ऋषीचे ब्राह्मणाला उचित असे जातकोपन-यनादि सर्व संस्कार त्याच्या पित्यानेंच क्रमशः केले. त्यानंतर मार्कंडेयानें त्यापाशीं यथा-शास्त्र वेदाध्ययन केलें व तो तपश्चर्या व झालेल्या अध्ययनाचें मनन करीत राहिला ॥ ७ ॥ त्यानें ब्रह्मचर्यव्रताची मोठी तीव्र दीक्षा घेतली व इंद्रियनिग्रह करून तो जटा व वल्कलें धारण करूं लागला. कमंडलु, दंड, यज्ञोपवीत, मेखला हीं देखील त्यानें घेतलीं ॥ ८ ॥ आपलें व्रत उत्कर्ष पावावें म्हणून कृष्णाजिन, रुद्राक्षाच्या माळा व दर्भ घेऊन तो सकाळ संध्याकाळ अशा दोन्ही संध्यांच्या प्रसंगीं अग्नि, सूर्य गुरु, ब्राह्मण व स्वतः यांच्या रूपानें श्रीहरि व्यक्त होतो असें मानून त्यांच्या द्वारा भगवंताचें पूजन करूं लागला ॥ ९ ॥ मौन धारण करून तो सकाळ-संध्याकाळ भिक्षा मागे व ती गुरूपाशीं आणून देई. गुरूची अनुज्ञा मिळाल्यास तो एकदां भोजन करी व न मिळाल्यास उपाशीच राही ॥ १० ॥ याप्रमाणें लक्षावधि वर्षें त्यानें स्वाध्यायाचें व्रत व तपश्चर्या चालवून परमेश्वराची आराधना केली व तेणेंकरून जिंकण्यास कठीण अशा मृत्यूवरहि विजय मिळविला ॥ ११ ॥ हें पाहून ब्रह्मदेव, भृगुऋषि, शंकर, दक्षप्रजापति व ब्रह्मदेवाचे जे इतर पुत्र होते त्यांना, तसेंच माणसें, देव, पितर व भूतें यांना मोठा विस्मय वाटला ॥ १२ ॥ याप्रमाणें खडतर व्रत

धारण करून तपश्चर्या, वेदाध्ययन व इंद्रियनिग्रह यांच्या योगें तो योगी मार्कंडेय परमेश्वराचें ध्यान करीत असल्यामुळें त्याच्या अंतःकरणाचे सर्व क्लेश नष्ट झाले ॥ १३ ॥ असें तीव्र योगसाधन करून तो योगी मार्कंडेय चित्तवृत्ति परमेश्वराच्या ठिकाणीं लावीत असतां सहा मन्वंतरांइतका दीर्घकाळ निघून गेला ॥ १४ ॥ चालू सातव्या मन्वंतरांत हें वृत्त इंद्राला जेव्हां समजलें, तेव्हां हे शौनक मुने, तो त्याच्या तपश्चर्येमुळें घाबरून गेला व तींत विघ्न उत्पन्न करून तिच्या नाशाच्या उद्योगाला लागला ॥ १५ ॥ त्यानें त्याला तपोभ्रष्ट करण्यासाठीं गंधर्व, अप्सरा, मदन, वसन्त, मलयपर्वतावरील शीतल वायु, रजोगुणापासून उत्पन्न होणारा असा लोभ व मद यांना त्याच्याकडे पाठविलें. ॥ १६ ॥

त्या मार्कंडेयाचा आश्रम हिमालय पर्वताच्या उत्तरेकडील बाजूला होता; त्या ठिकाणीं पुष्पभद्रा नांवाची नदी व चित्रा नांवाची शिला आहे. हे शौनका, इन्द्रानें पाठविलें असतां ती गंधर्वादि मंडळी त्याच्या आश्रमांत आली ॥ १७ ॥ तें स्थान पवित्र असून पवित्र वृक्ष व वेली यांनीं भरलेलें होतें. त्यांत पवित्र पक्ष्यांचे थवे नांदत होते. त्यातील पाण्याच्या विहिरी, तळीं इत्यादि पवित्र व स्वच्छ होतीं ॥ १८ ॥ तेथें पुष्पांतील मध पिऊन मत्त झालेले भ्रमर गुंजारव करीत असून तशाच प्रकारच्या कोकिलांचें गायन चाललेलें असे. मोर हर्षाच्या भरांत येऊन त्यांत ऐटीनें नाचत असत व इतरहि पक्ष्यांचे थवे उन्मत्तपणें त्यांत यथेच्छ मनमुराद संचार करीत असत ॥ १९ ॥

पर्वतश्रेष्ठ हिमालयांतील झऱ्यांतून जलबिन्दु घेऊन येणाऱ्या वायूचा त्या आश्रमांत प्रवेश झाल्यावर त्याची तेथील सुगंधी पुष्पांशीं गांठ पडल्यामुळें तेथें तो वाहूं लागला म्हणजे मदनाला स्वाभाविकपणेंच उत्तेजित करी ॥ २० ॥ वसंत ऋतूचा तेथें प्रादुर्भाव झाला तेव्हां रात्रीच्या आरंभीं नुकताच चंद्रोदय होत होता, वृक्षांना कोंवळे अंकुर फुटून फुलांचे ताटवे चमकूं लागले होते व गर्द छायेचे वृक्ष, वेली व झाळ्या याहि त्यांत शोभूं लागल्या होत्या ॥ २१ ॥ इतक्यांत अप्सरांचा थवा समागमें घेऊन हातीं धनुष्यबाण धरलेला मदन तेथें प्रकट झाला व त्याच्या मागून गाण्याचें व वाजविण्याचें साहित्य घेतलेले गंधर्वही आले ॥ २२ ॥

इन्द्राचे हे अनुयायी त्या आश्रमांत येतांच, मूर्तिमंत अग्नीसारखा तेजस्वी असा तो मार्कंडेय ऋषि त्यांच्या दृष्टीस पडला. अग्नीला आहुति देऊन तो नुकताच बसला असून त्यानें नेत्र मिटून घेतले होते. त्याला जिंकणें हें काम अत्यंत कठिण होतें ॥ २३ ॥ ती मंडळी त्याच्यापुढें आल्यावर अप्सरा तेथें नाचूं लागल्या आणि गंधर्व गाऊं लागले. मृदंग, वीणा, ढोल इत्यादि वाद्यांचें मनोहर वादन त्यांनीं चालू केलें ॥ २४ ॥ एवढें झाल्यावर मदनानें आपलें पंचमुखी अस्त्र धनुष्यावर ठेविलें आणि वसंत, लोभ इत्यादि इंद्राचे सेवक त्याच्या मनावर मारा करून त्याला चाळवूं लागले ॥ २५ ॥ पुंजिकस्थली नांवाची अप्सरा चेंडू खेळत असतां तिच्या स्तनाच्या जडपणामुळें तिची कमर अगदीं वांकून जाऊं लागली व तिच्या केशांतील फुलांच्या माळा सुटून गेल्या ॥ २६ ॥ ती

चेंडूच्या मागून इकडे तिकडे डोळे फिरवीत धावूं लागली असतां तिच्या कमरेतील पट्टा सुटला व इतक्यांत तिचें सूक्ष्म वस्त्र वायूनें भिराकावून दिलें ॥ २७ ॥ तेव्हां आतां आपण या मुनीचा पाडाव केलाच असें म्हणून मदनानें आपला बाण त्याच्यावर सोडिला; पण या सर्व गोष्टींचा त्या मुनीवर झालेला परिणाम शून्य होता! दुबळ्या माणसाचे सारे उद्योग जसे व्यर्थ जातात, तसाच हा प्रकार झाला ॥ २८ ॥ हे शौनक मुने, याप्रमाणें ते इंद्राचे सेवक मार्कंडेय मुनीला अपकार करण्यासाठीं प्रयत्न करीत असतां त्याच्या तेजानें तें जळूं लागले व मुलांनीं सर्पाला जागें करून मग त्याच्या भीतीनें पळून जावें तसें ते त्या आश्रमांतून पळून गेले ॥ २९ ॥ हे शौनक मुने, इन्द्रसेवकांनीं असा त्रास दिला असतांहि तो महर्षि मार्कंडेय अहंकाराला वश झाला नाहीं व ही गोष्ट त्याच्यासारख्या थोरांना उचित अशीच आहे. त्यांत आश्चर्य वाटण्यासारखें कांहीं नाहीं ॥ ३० ॥ असो. मग आपल्या अनुचरांसह हतप्रभ झालेला मदन परत आलेला इंद्रानें पाहिला व त्याच्या तोंडून ब्रह्मर्षि मार्कंडेयाचा हा प्रभाव ऐकून त्याला मोठें नवल वाटलें ॥ ३१ ॥ मार्कंडेयऋषि याप्रमाणें तपश्चर्या, वेदाध्ययन व इंद्रियदमन यांच्या योगानें आपलें चित्त परमेश्वरावर निश्चल करीत असतां त्यांच्यावर कृपा करावी या बुद्धीनें नरनारायणस्वरूपी श्रीहरि त्यांच्या पुढें प्रगट झाला ॥ ३२ ॥ त्यांतील एक श्वेतवर्णाचा व दुसरा कृष्णवर्णाचा असून त्यांचे नेत्र नवीन फुललेल्या कमळासारखे होते. त्या चतुर्भुजधारी मूर्तीनीं अंगावर मृगचर्म व वल्कल हीं वस्त्रें म्हणून धारण केलीं होतीं त्यांच्या बोटांत पवित्रकें असून तीन पदरी यज्ञोपवीत त्यांच्या गळ्यांत होतें व त्यांनीं वेळूचा सरळ दंड हातांत घेतला होता. त्यांच्या दुसऱ्या हातांत कमळ, रुद्राक्षमाळा आणि जीवजंतु झाडण्यासाठीं दर्भांची चवरी असून ते तपश्चर्येची प्रत्यक्ष मूर्तिच दिसत होते. त्यांची कांति लकलकणाऱ्या विजेच्या वर्णासारखी पिंवळसर असून त्यांचा बांधा उंच होता. मोठमोठे देव त्यांना मान देत होते ॥ ३३-३४ ॥

भगवदवतार असे नरनारायण ऋषि आपल्या पुढें उभे आहेत असें पाहतांच मार्कंडेय मोठ्या आदरानें उठून उभा राहिला आणि त्यानें त्यांच्यापुढें साष्टांग नमस्कार घातला ॥ ३५ ॥ त्यांच्या दर्शनामुळें झालेल्या आनंदानें त्याचा देह, इंद्रियें व अंतःकरण हीं भरून गेलीं. त्यांच्या अंगावर रोमांच उभे राहिले, त्याचें नेत्र प्रेमाश्रूंनीं भरून आले व त्यामुळें त्याच्यानें त्यांच्याकडे नीट पाहवेना ॥ ३६ ॥ तो पुनः उठून उभा राहिला व नम्र होऊन त्यानें हात जोडिले आणि मोठ्या उत्कंठेनें त्यांना जणूं आलिंगन देतच कीं काय, तो त्या समर्थ नरनारायणांना नमस्कार असो, नमस्कार असो, असें सगद्गद कंठानें म्हणूं लागला ॥ ३७ ॥

त्यानें त्यांना बसावयास आसन दिलें, त्यांचे पाय धुतले आणि पूजाद्रव्यें, सुगंधी उटी, धूप, माळा इत्यादिकांनीं त्यांची पूजा केली ॥ ३८ ॥ मग ते नरनारायण स्वस्थपणें आसनावर बसले आणि आपल्यावर कृपा करण्यास ते उत्सुक आहेत असें पाहून त्यानें

त्यांच्या पायांना पुनः नमस्कार केला आणि त्या थोर परमात्म्याशीं तो बोलूं लागला ॥ ३९ ॥ तो म्हणाला, ' हे समर्थ भगवन्, तुमच्या प्रभावाचें मीं काय वर्णन करावें ? प्राण्यांच्या शरिरांतील प्राण तुमच्या प्रेरणेनेंच स्फुरण पावतात. त्यांची वाणी, मन व इंद्रियें हींहि प्राणाप्रमाणेंच तुमच्याच प्रेरणेनें स्फुरण पावतात. सामान्य प्राण्यांची गोष्ट कशाला ? प्रत्यक्ष ब्रह्मदेव, शंकर, तसाच मीं स्वतः यांचीहि तीच स्थिति आहे. तथापि तुझी भक्ति करणारांचा मात्र त्यांच्या भक्तीमुळें तूं आप्त झालेला आहेस ॥ ४० ॥ हे भगवन्, हीं रूपें जीं तुम्हीं धारण केलीं आहेत, तीं सर्व त्रैलोक्याच्या कल्याणासाठीं, दुःखपरिहारासाठीं व मृत्युंजयासाठींच होत, तुम्ही इतर जे निरनिराळे अवतार धारण करतां. तेहि लोकांचें रक्षण करण्यासाठीं करतां. हें जग तुम्हीच उत्पन्न करतां व पुनः तुम्ही त्याचा लय करतां. जसा कोळी आपल्या अंगांतून धागा काढून तो पुनः आपल्या शरिरांत विलीन करितो, तसाच हा प्रकार होय ॥ ४१ ॥ असे जे तुम्हीं या विश्वाचें रक्षण करणारे आणि स्थावरजंगमात्मक सृष्टीचें नियमन करणारे आहां, त्या तुमच्या चरणाला मीं शरण आलों आहें. कारण तुमच्या चरणाचा आश्रय करणाराला कर्म, गुण, काल, रोग इत्यादिकांची पीडा होत नाहीं, त्याची प्राप्ति व्हावी म्हणून वेदवेत्ते विचारशील पुरुष त्याचें नित्य स्तवन, पूजन व ध्यान करून त्याला नमस्कार करितात ॥ ४२ ॥ हे परमेश्वर हो, तुमच्या चरणकमलाच्या आश्रया-शिवाय सर्वतोपरि भीतिग्रस्त अशा या लोकांना कल्याणकारक असें दुसरें साधन आम्हांला तर कांहीं ठाऊक नाहीं तुम्ही परम कल्याणाची म्हणजे मोक्षाची केवळ मूर्ति आहां. दोन परार्ध इतका काळपर्यंत ज्याचें स्थान अढळ असतें असा ब्रह्मदेवही तुमच्या काळस्वरूपाला अत्यंत भीत असतो, मग ब्रह्मदेवानें निर्मिलेल्या प्राण्यांची गोष्ट काय सांगावी ? ४३ ॥

वस्तुतः केवळ चैतन्यस्वरूप असतांहि, उपाधिमुळें आत्मस्वरूपाला झाकून टाकणाऱ्या निःसार, विनाशी व मिथ्या अशा देवादिकांचा त्याग करून सत्यस्वरूप जीवांचें नियमन करणारा व कार्यकारणांच्या पलीकडे असणारा जो तूं—त्या तुझ्या चरणांचा मी आश्रय करीत आहें. कारण, त्याचा आश्रय केल्यानेंच तुजपासून सर्व मनोरथांची प्राप्ति होते ॥ ४४ ॥ हे ईश्वर हो, तुम्ही जीवाचें कल्याण करणारे असून सात्त्विक, राजस व तामस अशीं जीं मायिक रूपें तुम्हीं लीलेनें धरिलीं आहेत तीं या विश्वाच्या उत्पत्तीला, उत्कर्षाला व विलयाला कारणीभूत आहेत; पण त्यांतील तुमचीं सात्त्विक मूर्तिच मनुष्यांना मोक्षदायी आहे. इतर नाहींत. कारण इतरांपासून संकटें, मोह, भीति हींच उत्पन्न होतात ॥ ४५ ॥

यास्तव, हे भगवन्, तुमच्या भक्तांना तुमची ही शुक्लवर्ण सात्त्विक मूर्तिच फार आवडते व ज्ञानी पुरुष तिचाच आश्रय करितात. भक्तांना परमेश्वराचें सात्त्विक स्वरूपच पाहिजे असतें, इतर स्वरूपें नको असतात. कारण ज्या सात्त्विक स्वरूपापासून त्यांना अभय मिळतें व आत्मसुखाची प्राप्ति होते ॥ ४६ ॥ अशा तुम्हां भगवान् पुरुषोत्तमाला मी नम-

स्कार करितों. तुम्ही सर्वव्यापी व विश्वस्वरूपी असून सर्वांचे मार्गदर्शक व श्रेष्ठ दैवत आहां. तुम्ही नारायण ऋषि, नरश्रेष्ठ, शुद्ध मूर्ति, वाणीचें नियमन करणारे व वेदमार्गाचे प्रवर्तक आहां ॥ ४७ ॥ मिथ्या अशा इंद्रियांच्या मार्गात पडून ज्यांच्या बुद्धीला भ्रम झाला आहे अशा लोकांना स्वतःच्या इंद्रियांत, प्राणांत, हृदयांत व विषयांतहि तुम्हीं आहांत, हें त्यांच्या लक्षांत येत नाहीं. कारण, तुमच्या मायेनें त्यांची बुद्धि आच्छादून गेलेली असते. तथापि अशा भ्रमिष्ट असलेला पुरुषहि तुमच्या या वेदमार्गाच्या आश्रयाला एकदां आला म्हणजे त्यालाच सर्व प्रकारचें साक्षात् ज्ञान होऊं लागतें; कारण तुम्ही सर्वांना ज्ञान देणारे गुरु आहां ॥ ४८ ॥ आत्म्याचें रहस्य प्रकट करणारें असें ज्याचें दर्शन वेदांतच घडतें, ज्याच्यासाठीं यत्न करीत असतां ब्रह्मदेव आदिकरून ज्ञानी पुरुषहि मोह पावतात, ज्याचें रूप व गुण सर्व शास्त्रांच्या प्रतिपादनाला अनुरूप असून ज्याचें ज्ञान देहादि उपाधीनें झाकून गेलेलें आहे, अशा त्या महापुरुषाला मी वंदन करितों ॥ ४९ ॥

**आठवा अध्याय समाप्त**

---

# अध्याय ९ वा



सूत म्हणतो, हे शौनक मुने, बुद्धिवान् मार्कंडेयानें याप्रमाणें स्तुति केली असतां नराचा मित्र असा तो भगवान् नारायण संतुष्ट होऊन मार्कंडेयाला उत्तर देऊं लागला ॥ १ ॥

भगवान् म्हणाला, 'हे ब्रह्मर्षिश्रेष्ठा मार्कंडेया, या आपल्या योगसमाधीच्या योगें-करून त्याचप्रमाणें मजविषयींच्या उत्कट भक्तीनें आणि उग्र अशी तपश्चर्या, वेदाध्ययन व इंद्रियदमन यांच्या योगें तूं पूर्ण कृतकृत्य झाला आहेस. ॥ २ ॥ तुझ्या या तीव्र व्रताचरणानें आम्ही तुजवर संतुष्ट झालों आहों. आम्ही वर देणाऱ्यांचे अग्रणी आहों; तरी तुझ्या मनांत असेल तो इष्ट वर तूं आमच्यापासून मागून घे. तुझें कल्याण असो!' ॥ ३ ॥

मार्कंडेयानें उत्तर केलें, 'हे समर्थ परमेश्वरा, हे शरणागताचें दुःख निवारण करणाऱ्या अच्युता, तुझा सर्वत्र विजय आहे. तुझें दर्शन मला झालें, हाच एवढा वर मला पुरे झाला ॥ ४ ॥ योगसाधनानें चित्त शुद्ध केल्यावर ज्या तुझ्या सुंदर पदकमलाचें दर्शन घेऊन ब्रह्मादि देवहि धन्यता मानितात, त्या तुमचें प्रत्यक्ष दर्शन मला झालें, याहून मोठा दुसरा लाभ कोणता असणार? ॥ ५ ॥ तथापि, हे कमलनयना, हे पवित्रकीर्ति पुरुषांमध्यें श्रेष्ठ अशा भगवंता, ज्या तुझ्या मायेच्या योगानें लोकपालांसह सर्व लोक एक-मेवाद्वितीय अशा सद्वस्तूच्या ठिकाणीं भेद पाहूं लागतात, ती तुझी माया पाहावी अशी माझी इच्छा आहे' ॥६॥

सूत म्हणतो, हे शौनक मुने, मार्कंडेयानें याप्रमाणें भगवान् नरनारायणांची स्तुति-पूर्वक मनोभावानें पूजा केल्यावर 'ठीक आहे, ती माया तुला दाखवितों' असें म्हणून हंसत हंसत ते भगवान् बदरिकाश्रमाकडे निघून गेले ॥ ७ ॥ नंतर आपल्या त्या आश्रमांत राहणाऱ्या मार्कंडेयाच्या मनांत तो विषय एकसारखा घोळूं लागला. अग्नि, सूर्य, चंद्र, जल, पृथ्वी, वायु, आकाश आणि स्वतः अशा सर्व ठिकाणीं श्रीहरिच भरलेला आहे असें समजून तो त्याचें ध्यान करीत त्याची मनोमय पूजाद्रव्यांनीं पूजा करूं लागला. केव्हां केव्हां भक्तीच्या ओघांत बुडून गेल्यामुळें त्याला पूजा करण्याचेंहि भान राहत नसे ॥८॥ ॥ ९ ॥ असें चाललें असतां, हे शौनक मुने, एके दिवशीं मार्कंडेय संध्याकाळीं पुष्पभद्रा नदीच्या कांठीं ईश्वराची उपासना करीत बसला असतां मोठा सोसाट्याचा वारा वाहूं लागला ॥१०॥

त्या सोसाट्याच्या वायूचा मोठा प्रचंड शब्द होऊं लागला व त्याच्या मागोमाग भयंकर मेघ आकाशांत संचार करूं लागले. विजांचा गडगडाट चालू झाला आणि मेघ

मुसळासारख्या मोठाल्या पावसाच्या धारा सोडूं लागले ॥११॥ इतक्यांत भोंवतालीं चार समुद्र दिसूं लागले व त्यांनीं पृथ्वीचें आक्रमण करण्यास आरंभ केला ! वाऱ्याच्या वेगामुळें त्यांत प्रचंड लाटा उसळूं लागल्या व भयंकर जलचरें आणि बिक्राळ भोंवरे यांच्या गंभीर शब्दांनीं ते भरून गेले ॥१२॥ पाणी आकाशाच्याहि वर चढूं लागलें व सारें जग त्या पाण्यानें, सूर्याच्या प्रखर किरणांनीं व विजांच्या तडाक्यांनीं अंतर्बाह्य पीडित झालें. चारी प्रकारच्या योनींची आणि आपल्या स्वतःसह साऱ्या पृथ्वीची स्थिति जलमय होऊन गेली असें पाहून मार्कंडेय मुनीचें मन अस्वस्थ झालें ॥१३॥ खिन्नांतःकरणानें आश्चर्यचकित होऊन तो जों पाहात आहे तोंच त्या महासागरांतील पाणी वाऱ्यानें गरगर फिरूं लागलें व सारख्या मुसळधारा सोडणाऱ्या मेघांच्या योगें भयंकर लाटा उत्पन्न होऊन तें पाणी इतकें वाढलें कीं, त्यांत पृथ्वीवरील खंडें, देश, पर्वत हीं सर्व त्याच्या खालीं झांकून गेलीं ॥१४॥ पृथ्वी, अंतरिक्ष, आकाश, नक्षत्रमाला इत्यादिकांसह सारें त्रैलोक्य व दिशा पाण्यांत बुडून गेलीं आणि एकटा तो महर्षि मार्कंडेय मात्र तसाच राहिला. तेव्हां एखाद्या वेड्या किंवा आंधळ्याप्रमाणें जटा विस्कटून तो भ्रमण करूं लागला. भूक व तहान यांनीं तो अत्यंत पिडून गेला. मगर, देवमासे इत्यादि जलचरें त्याला त्रास देऊं लागलीं व लाटा उत्पन्न करणाऱ्या वायूचेहि तडाखे त्याला बसूं लागले. तो त्या अफाट समुद्रांत पडून गटंगळ्या खाऊं लागला व त्याला दिशा, पृथ्वी, आकाश हीं कोठें आहेत याचाहि थांग लागेना. श्रमानें तर तो अगदीं व्याकुळ होऊन गेला ॥ १५. १६ ॥ तो एखादे वेळीं मोठ्या भोंवऱ्यांत सांपडे तर पुनः केव्हां लाटांचा मार खाई, तर केव्हां एकमेकांना मारूं पाहणारीं जलचरें त्याला खाऊन टाकण्याचा यत्न करीत ॥ १७ ॥ अशा स्थितींत तो कव्हां रडे, तर केव्हां बेशुद्ध पडे. कधीं दुःखी होई, तर कधीं त्या संकटांतून सुटण्याची आशा लागून आनंदी होई. कधीं घाबरून जाई, तर रोगांनीं अगदीं पिडून गेल्यामुळें आतां आपण मरणार असें त्याला वाटे ॥१८॥ अशा रीतीनें श्रीविष्णूच्या महामायेनें ग्रस्त होऊन तो त्या महासागरांत भ्रमण करीत असतां शेंकडों किंवा हजारों लक्षावधि वर्षांचा काळ निघून गेला ॥१९॥ असा तो मुनि भ्रमण करीत असतां, त्याला एका उंचवट्याच्या माथ्यावर फळें व पानें यांनीं भरून गेलेलें एक लहानसें वडाचें झाड दिसलें ॥२०॥ त्या झाडाच्या ईशान्य दिशेकडील एका खांदीवर पानाच्या द्रोणांत शयन केलेला एक बालक त्याच्या दृष्टीस पडला. तो इतका तेजस्वी होता कीं, आपल्या प्रभेनें तो सारा अंधकार गिळून टाकीत आहे कीं काय असें भासे ॥२१॥

त्या बालकाचा वर्ण पाचूच्या वर्णासारखा सांवळा असून त्याचें मुख अत्यंत रमणीय होतें. त्याची मान शंखाप्रमाणें त्रिवलीयुक्त व वक्षःस्थळ विस्तृत असून नाक व भुवया मनोहर होत्या ॥२२॥ श्वासोच्छ्वासाबरोबर हालणाऱ्या मस्तकावरील केशांमुळें तें सुंदर दिसत होतें. त्याच्या शंखासारख्या सुंदर कानांवर डाळिंबीचीं फुलें रुळत होतीं

व पोवळ्यासारख्या आरक्त ओठांच्या कांतीनें त्याचें अमृतासारखें मधुर हास्य किंचित् रक्तवर्ण दिसत होतें ॥ २३ ॥ त्याच्या नेत्रांचे कोंपरे कमळगाभ्याप्रमाणें तांबुस होते, त्याचें हास्ययुक्त अवलोकन मन वेधून टाकणारें होतें व श्वासोच्छ्वासामुळें हालणाऱ्या वळ्यांनीं त्याच्या पिंपळपानासारख्या उदरावरील नाभिकमल झांकून गेलें होतें ॥२४॥ त्याच्या हाताचीं बोटें सुंदर होतीं व आपल्या हातांनीं आपला कमळासारखा पाय उचलून तोंडांत घालून तो चुंफीत होता. त्या बालकाला पाहून मार्कंडेयाला मोठा विस्मय वाटला ॥२५॥ त्याला पाहतांच त्या मुनीचे सारे श्रम दूर झाले व त्याचें हृदय व नेत्र आनंदानें भरून गेले. त्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले व त्या बालकाच्या अद्भुत स्वरूपावरून तो कोण असावा हें त्याला कळेना. त्या बालकाला विचारावें म्हणून मार्कंडेय पुढें सरून त्याच्य जवळ गेला ॥२६॥

इतक्यांत त्या बालकाच्या श्वासाबरोबर एखाद्या घुंगुरड्याप्रमाणें तो ऋषि त्याच्या शरिरांत शिरला; त्या शरिरांत त्याला बाहेरच्याप्रमाणें रचना असलेलें सारें विश्व दिसूं लागलें व तो चमत्कार पाहून तो मूढ झाला ॥२७॥ त्या शरिरांत त्याला आकाश, पृथ्वी व अंतरिक्ष, नक्षत्रसमूह, पर्वत, समुद्र, खंडें, देश, दिशा, देव व असुर, अरण्यें, प्रांत, नद्या, नगरें, खाणी, खेडीं, गौळवाडे, चारी वर्णाचे लोक; त्यांचे चारी आश्रम व त्यांचे आचार, तशींच पंचमहाभूतें, त्या भूतांपासून झालेले पदार्थ, अनेक युगें व कल्प यांची रचना, इतर प्रकारच्या व्यवहाराला कारणीभूत असें जें कांहीं आहे, तें सर्व अगदीं खऱ्या वस्तूप्रमाणें तेथें त्याला व्यक्त झालेलें दिसून आलें ॥२८, २९॥ त्याला त्या बालकाच्या शरिरात हिमालय पर्वत, ती पुष्पवहा नदी, त्याचा स्वतःचा आश्रम व त्यांतील ऋषिहि दिसून आले. हें सर्व तो तेथें पाहातो आहे, इतक्यांत पुनः त्या बालकाच्या उच्छ्वासाबरोबर तो बाहेर आला व त्या प्रलयकालीन समुद्रांत पडला ! ॥ ३० ॥ तेव्हां पृथ्वीच्या त्या उंचवट्यावर उगवलेलें तें वडाचें झाड व त्या झाडाच्या पानाच्या द्रोणांत निजलेला तो बालक पुनः त्याला दिसला व त्या बालकानेंहि प्रेमळ असें अमृतासारखें मधुर हास्य करून तिरक्या दृष्टीनें मार्कंडेयाकडे पाहिलें ॥३१॥ मार्कंडेय अगदीं थकून गेला होता, तथापि आपल्या हृदयांत अधिष्ठित झालेल्या त्या बालकाला डोळ्यांनीं पाहतांच त्या भगवत्स्वरूपाला मिठी मारण्यासाठीं तो पुढें सरसावला ॥३२॥ पण इतक्यांत दुबळ्या माणसाचे मनोरथ जसे वितळून जावे, तसा हृदयांत निवास करणारा तो भगवान् योगेश्वर श्रीहरि मार्कंडेयापुढें गुप्त झाला ॥३३॥ हे शौनक मुने, तो गुप्त होतांच तें वडाचें झाड व लोकप्रलय करणारा तो पाण्याचा पूर, सारेंच क्षणांत नाहींसें झालें व पूर्वीप्रमाणें आपण आपल्या आश्रमांत आहों असें मार्कंडेयाला दिसून आलें ॥३४॥

## नववा अध्याय समाप्त

# अध्याय १० वा



सूत म्हणतो, शौनकमुने, याप्रमाणें भगवान् नारायणानें निर्माण केलेला आपल्या योगमायेचा प्रभाव कसा आहे, याचा अनुभव घेतल्यावर मार्कंडेय त्या नारायणाला शरण गेला ॥१॥

तो म्हणाला, हे श्रीहरे, शरणागताला अभय देणाऱ्या अशा तुझ्या पायांचा मीं आश्रय केला आहे. ज्ञानाप्रमाणेंच प्रकाशणाऱ्या अशा तुझ्या मायेनें देव सुद्धां मोह पावतात (तेथें माझा काय पाड ?) ॥२॥

सूत म्हणतो, हे शौनक मुने, मार्कंडेय याप्रमाणें अंतःकरण स्थिर करून बसला असतां, नंदीवर बसून पार्वतीसह भगवान् शंकर आपल्या गणांसमवेत आकाशमार्गानें चालला होता, त्याच्या दृष्टीस तो पडला ॥ ३ ॥ पार्वतीनें जेव्हां त्या मुनीला त्या स्थितींत पाहिलें तेव्हां ती शंकराला म्हणाली, 'हे भगवन्' हा पाहा ब्राह्मण आपला देह, इंद्रियें व अंतःकरण अगदीं निश्चल करून बसला आहे ॥ ४ ॥

वारा मुळींच वाहात नाहीं अशा वेळीं पाणी व जलचरें, स्थिर असलेला समुद्र जसा शांत असतो, तसा हाहि अगदीं शांत आहे. याच्या या तपश्चर्येचें फळ याला द्यावें. आपण प्रत्यक्ष सिद्धि देणारे आहां !' ॥ ५ ॥

भगवान् शंकरानें उत्तर केलें, 'हे पार्वति, या ब्रह्मर्षीला कोणत्याहि उपभोगाची इच्छा नाहीं. फार काय ? पण याला मोक्ष देखील नको आहे. कारण अव्यय अशा भगवान् पुरुषोत्तमावर त्याची परम भक्ति जडली आहे ॥ ६ ॥ तथापि हे पार्वति, आपण या सच्छील ब्राह्मणापाशीं थोडेंसें बोलूं या. कारण मनुष्यांना सच्छील पुरुषांची संगति मिळणें हा खरोखर मोठाच लाभ होय' ॥ ७ ॥

सूत म्हणतो, हे शौनक मुने, याप्रमाणें पार्वतीला सांगितल्यावर साधूचें आश्रय-स्थान, सर्व विद्यांचें माहेरघर व प्राणिमात्राचा नियंता असा भगवान् शंकर मार्कंडेयाजवळ गेला ॥ ८ ॥ पण जगाचीं अंतर्यामी अशीं तीं समर्थ शंकरपार्वती जवळ आलीं हें मार्कंडेयाला कळलेंहि नाहीं ! कारण, तो चित्तवृत्तींचा निरोध करून बसल्यामुळें स्वतःची किंवा जगाचीहि त्याला शुद्धि नव्हती ॥ ९ ॥ तो प्रकार भगवान् शंकराला योगमायेनें कळतांच छिद्रांतून वायु शिरावा त्याप्रमाणें तो भगवान् मार्कंडेयाच्या हृदयाकाशांत शिरला ॥१०॥

तेव्हां आपल्या हृदयांत श्रीशंकर प्रविष्ट झाला असून, विजेच्या वर्णाप्रमाणें पिंगट जटा त्यानें धारण केल्या आहेत, त्याला तीन नेत्र व दहा बाहु असून तो उंच

बांध्याचा व उगवत्या सूर्याप्रमाणें तेजस्वी आहे, त्यानें वाघाचें चर्मवस्त्र म्हणून अंगावर घेतलें असून हातांत शूल, खट्वांग आणि ढाल हीं धरिलीं आहेत, तसेंच गळ्यांत रुद्राक्ष-माला व हातांत डमरु, कपाल, तरवार व धनुष्य हीं धरिलीं असून तो एकाएकीं हृदयांत प्रकाशमान झाला आहे असें पाहतांच मार्कंडेय अगदीं चकित झाला आणि हें काय आहे व कोठून आलें, असें म्हणून त्यानें आपली समाधि उतरविली ॥ ११ ॥ १२ ॥ १३ ॥ त्यानें डोळे उघडून पाहिलें तों भगवान् शंकर, पार्वती व गण यांसह आपल्या पुढें उभा आहे. त्रैलोक्याचा मार्गदर्शक अशा त्या शंकराला पाहतांच मार्कंडेयानें मान वांकवून त्याला नमस्कार केला ॥ १४ ॥ त्यानें पार्वतीसह व गणांसह भगवान् शंकराचें स्वागत करून त्यांना आसन दिलें व पाय धुवावयास पाणी, अर्घ्य, गंध, माळा, धूप, दीप इत्यादि देऊन त्यांची पूजा केली ॥ १५ ॥

नंतर तो भगवंताला म्हणाला, ' हे प्रभो, स्वतःच्या पराक्रमानेंच तुमच्या सर्व इच्छा परिपूर्ण झालेल्या आहेत, तेव्हां आम्हीं तुमचें कोणतें कार्य करावें बरें? हे भगवन्! तुमच्या प्रभावामुळें सर्व जग सुखी झालें आहे ॥ १६ ॥ शांत, सत्त्वगुणाधिष्ठाता; जगाला सुख देणारा; रजोगुण स्वीकारूनहि शांतरूप धारण करणारा व तमोगुणात्मक अशा तुज शंकराला मी नमस्कार करतों ' ॥ १७ ॥

सूत म्हणतो, हे शौनकमुने! याप्रमाणें सज्जनांचा आधार अशा आदिदेव भगवान् शंकराची मार्कंडेयानें स्तुति केली, तेव्हां तो संतुष्ट झाला व अंतःकरणांत प्रसन्न होऊन हंसत हंसत त्याला उत्तर देऊं लागला ॥ १८ ॥

शंकर म्हणाला, 'हे मार्कंडेया, तुला इष्ट असेल तो वर तूं आमच्यापासून मागून घे. आम्ही तिघे देव म्हणजे ब्रह्मदेव, विष्णु व मी हे सर्व वर देणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ आहों. आमचें दर्शन कधींहि व्यर्थ जाणारें नाहीं. मनुष्याला आमच्या दर्शनानेंच मोक्ष प्राप्त होतो ॥ १९ ॥ ब्राह्मण व शमयुक्त साधु असे जे कोणी सर्वसंगपरित्याग करून व प्राणि-मात्राविषयीं प्रेम धरून आमची एकनिष्ठ भक्ति करतात, जे कोणाशीं वैर न करितां सर्व ठिकाणीं समबुद्धीनें पाहतात. अशा एकनिष्ठ भक्तांना सर्व लोक वंदन करतात व त्यांची सेवा करितात. मी, ब्रह्मदेव व समर्थ श्रीविष्णु, असे आम्हीहि तसेंच करितों ॥ २० ॥ २१ ॥ मी, विष्णु व ब्रह्मदेव यांमध्यें आमचे ते भक्त अणुमात्र भेद ठेवीत नाहींत, तसाच आपण स्वतः व इतर लोक यांच्याविषयींहि ते भेददृष्टि ठेवीत नाहींत. यास्तव आम्ही तुमच्यासारख्या भक्तांना भजत असतों ॥ २२ ॥ जलयुक्त तीर्थें व धातु-पाषाणादिकांचे देव हे मनुष्यांना कालान्तरानें पवित्र करीत असतील; पण तुमच्या-सारख्या भक्तांच्या दर्शनानें मनुष्य तत्काल पवित्र होतो ॥ २३ ॥ ब्राह्मण हे आमचेंच वेदमय स्वरूप आत्मसमाधान, तपश्चर्या, अध्ययन व इंद्रियनिग्रह यांच्या योगानें धारण करितात व म्हणून आम्ही त्यांना नमस्कार करितों ॥ २४ ॥ तुमच्या उपदेशश्रवणानें

व दर्शनानें सुद्धां महापातकी व अंत्यज हे शुद्ध होतात, मग तुमच्याशीं संभाषण केल्यानें ते शुद्ध होतील हें सांगावयास नकोच.' ॥ २५ ॥

सूत म्हणतो, हे शौनक मुने, अशा प्रकारें धर्माचें रहस्य ज्यांत भरपूर आहे असें चंद्रमौलि भगवान् शंकराचें अमृतमय भाषण मार्कंडेय ऋषि कर्णपुटानें पीत असतां त्याची तृप्ति झाली नाहीं; आणखी आणखी तें ऐकावें असें त्याला वाटे ॥ २६ ॥ बराच काळपर्यंत विष्णूच्या मायेनें त्याला भ्रमण करावयास लाविल्यामुळें तो फार त्रस्त झाला होता; पण शंकराच्या अमृतमय शब्दांनीं त्याचे सारे क्लेश दूर झाले व तो भगवंताला उत्तर देऊं लागला ॥ २७ ॥

मार्कंडेय म्हणाला, ' हे भगवन् ! तुम्हां परमेश्वरांची ही लीला प्राण्यांना समजण्यास अत्यंत कठीण आहे. पाहा कीं, जगाचे नियन्ते असे तुम्ही असतांहि आमच्यासारख्यांना म्हणजे ज्यांचें तुम्ही नियंत्रण करतां त्यांनाच नमस्कार करितां ॥२८॥ ( मला वाटतें लोकांना धर्म शिकविण्याकरितांच तुम्ही असें करितां. ) लोकांना उपदेश करणारे तुमच्यासारखे पुरुष बहुधा त्या धर्माचें आचरण स्वतः करितात, त्याला संमति देतात आणि तसें आचरण करणाराच्या वर्तनाची स्तुति करितात ॥ २९ ॥ पण त्यांचा वास्तविक थोरपणा या मायावी आचरणांनीं दूषित होत नाहीं. इंद्रजालाचे खेळ करणारावर जसा त्या खेळामुळें कांहीं परिणाम होत नाहीं, तसाच हा प्रकार होय ॥ ३० ॥ श्रीहरि मनानेंच हें सर्व विश्व उत्पन्न करून त्यांत मनानेंच प्रवेश करितो आणि स्वप्नांतील देखावे पाहणारा पुरुष जसें स्वतः कांहीं न करतां केल्यासारखें मानितो, त्याप्रमाणें वस्तुतः सत्त्वादि गुणच आपलीं कार्यें करीत असतां, तो परमेश्वर त्यांचा जणूं कर्ता आहे असें भासतें ॥ ३१ ॥ त्या त्रिगुणात्मक भगवत्स्वरूपाला, त्या एकमेव अद्वितीय अशा गुरुस्वरूपी परब्रह्माला मी नमस्कार करितों ॥ ३२ ॥ हे विश्वव्यापका, तुमच्यासारख्या वर देणाऱ्याच्या दर्शनानंतर आतां दुसरा वर तो मीं काय मागावा ? तुमच्या दर्शनानेंच मनुष्याचे सर्व मनोरथ पूर्ण होतात व त्याच्या वासना सत्यमय होतात ॥ ३३ ॥

तथापि तुम्ही म्हणतांच तर मनोरथपूर्तीचा पाऊस पाडणाऱ्या परिपूर्णस्वरूपी अशा तुमच्यापाशीं एक वर मागतों. तो हाच कीं, भगवान् श्रीहरीच्या ठिकाणीं, त्याच्या भक्तांच्या ठिकाणीं व तुमच्या ठिकाणीं माझें अढळ प्रेम असावें ' ॥ ३४ ॥

सूत म्हणतो, हे शौनक मुने, याप्रमाणें गोड शब्दांनीं मार्कंडेयानें भगवान् शंकराची बहुमानपूर्वक स्तुति केली असतां व पार्वतीनेंहि शंकराचें त्याविषयीं अभिनंदन केलें असतां शंकर त्याला म्हणाला ॥ ३५ ॥ ' हे महर्षे, तुझी ही सर्व इच्छा पूर्ण होईल. श्रीहरीच्या ठिकाणीं तुझी अखंड भक्ति राहील इतकेंच नव्हे, तर तुझी पवित्र कीर्ति सर्वत्र पसरून तुला कल्पसमाप्तीपर्यंत वृद्धपण व मृत्यु येणार नाहींत ॥ ३६ ॥ हे मुने, तुला भूत,

भविष्य व वर्तमान अशा तिन्ही काळांचें ज्ञान, तसेंच वैराग्ययुक्त ब्रह्मज्ञान प्राप्त होईल व तूं ब्रह्मतेजानें युक्त होऊन पुराणांचा प्रवर्तक होशील ! ' ॥ ३७ ॥

सूत म्हणतो, हे शौनक मुने, याप्रमाणें मार्कंडेयाला वर देऊन भगवान् शंकर तेथून निघून गेला आणि जातां जातां मार्कंडेयानें पूर्वी अनुभवलेल्या गोष्टींचें वृत्त त्यानें पार्वतीला सांगितलें ॥ ३८ ॥ मार्कंडेयहि मोठा योगसामर्थ्यवान् श्रीहरीचा एकनिष्ठ भक्त होऊन सांप्रत पृथ्वीवर फिरत आहे ॥ ३९ ॥

बुद्धिमान् मार्कंडेय मुनींनें अनुभवलेल्या भगवंताच्या मायेच्या प्रभावाचें असें हें आश्चर्यकारक वृत्त असून तें मीं तुम्हांला सांगितलें आहे ॥ ४० ॥ परमात्म्याच्या मायेचा पसारा जाणणारे कित्येकजण मार्कंडेयाचें वृत्त म्हणजे अनादि कालापासून पुनः पुनः होणारें मनुष्याच्या जन्ममरणाच्या फेऱ्यासारखें होय असें म्हणतात; पण तसें नसून तें एका विशिष्ट काळींच होऊन गेलेलें आहे ॥ ४१ ॥ हे शौनक मुने, असें हें चक्रपाणी श्रीहरीच्या प्रभावाचें वृत्त तुला सांगितलें. जो कोणी हें स्वतः श्रवण करील व दुसऱ्याला ऐकवील, त्याला कर्मवासनेनें प्राप्त होणारा जन्ममरणरूप संसार घडणार नाहीं ॥ ४२ ॥

दहावा अध्याय समाप्त

# अध्याय ११ वा



शौनक मुनि म्हणतात, हे भगवद्भक्त सूता, सर्व तंत्रग्रंथांतील सिद्धांतांचें रहस्य तसेंच इतरहि सर्व प्रकारचें उत्तम ज्ञान तुला आहे. म्हणून आणखी एक गोष्ट तुला आम्हीं विचारितों ॥ १ ॥ लक्ष्मीपति विष्णु निर्गुण असतांहि तंत्र × मार्गाचे उपदेशक त्याच्या पूजेच्या प्रसंगीं त्याचीं अंगें, उपांगें, आयुधें व अलंकार * यांची कल्पना करितात, ती कोणत्या प्रकारें व कोणत्या वस्तूंना उद्देशून करितात, तें आम्हांला कृपा करून सांग. तुझें कल्याण असो. ज्या पूजाकर्मांत नैपुण्य संपादन केल्यानें मरणशील असा मनुष्यप्राणी अमरत्व प्राप्त करून घेतो, ती कर्मविद्या जाणण्याची आम्हांला इच्छा आहे ॥ २ ॥ ३ ॥

सूत म्हणतो, हे शौनक मुने, आपल्या गुरूंना वंदन करून, ब्रह्मदेवादि आचार्यांनीं वेद आणि तंत्र यांत विष्णूच्या ज्या विभूति सांगितल्या आहेत त्या मी तुम्हांला सांगतों ॥ ४ ॥ प्रकृति आदिकरून नऊ तत्त्वांच्या योगानें विकारात्मक असें विराट्पुरुषाचें शरीर निर्माण केलेलें दिसून येतें. चैतन्यमय अशा त्या विराट् स्वरूपांतच स्वर्गादि तिन्ही लोकांचा समावेश होतो ॥ ५ ॥

हें जें समर्थ अशा विराट्पुरुषाचें शरीर, त्याचे पाय म्हणजे पृथ्वी; मस्तक म्हणजे स्वर्ग; आकाश म्हणजे नाभि; सूर्य हा डोळे, नाकपुड्या म्हणजे वायु व कान म्हणजे दिशा होत ॥ ६ ॥ ब्रह्मदेव हा त्याचें शिश्न व मृत्युदेवता म्हणजे त्या समर्थ शरिराचें अपानद्वार होय. त्याचे बाहु म्हणजे इंद्रादि लोकपाल, मन म्हणजे चंद्र आणि भ्रुकुटी म्हणजे यमराज होय ॥ ७ ॥ त्याचा वरचा ओंठ म्हणजे लज्जा व खालचा ओंठ म्हणजे लोभ असून दांत म्हणजे चंद्रप्रकाश व हास्य म्हणजे भ्रमण होय. त्याचे अंगावरील केश म्हणजे पर्वत होत व मस्तकावरील केश म्हणजे मेघ होत ॥ ८ ॥ सामान्य मनुष्य आपल्या मानानें सात विती उंचीचा असतो, तसाच विराट् पुरुषहि भूः आदि करून सात लोकांच्या प्रमाणानें सात लोक उंचीचा आहे ॥ ९ ॥ तो परमात्मा कौस्तुभ मण्याच्या रूपानें आत्मतेज धारण करीत असून त्याच्या वक्षःस्थलावर धारण केलेलें श्रीवत्स चिन्ह म्हणजे त्या आत्मतेजाची सर्व-व्यापी प्रभा होय ॥ १० ॥ त्याच्या गळ्यांतील वनमाला नांवाची माला म्हणजे त्याची त्रिगुणात्मक माया असून त्याच्या अंगावरील पीत वस्त्र म्हणजे वेद व यज्ञोपवीत म्हणजे

---

× उपासनेच्या बहुविध पद्धतींपैकीं तंत्र ही एक पद्धति आहे. विशिष्ट देवता विशिष्ट विधीनें वश करून घ्यावयाची व तिच्यापासून इष्टसिद्धि मिळवावयाची अशा प्रकारचा हा तंत्रमार्ग आहे.

* हात, पाय इत्यादि अवयव म्हणजे अंगें; गरुड, शेष इत्यादि उपांगें; सुदर्शन चक्र, गदा इत्यादि आयुधें व कौस्तुभ, वनमाळा इत्यादि अलंकार होत असें समजावें.

त्रिवर्णात्मक ॐकार होय ॥ ११ ॥ त्या परमेश्वराच्या कानांत धारण केलेलीं दोन मकराकार कुंडलें म्हणजे सांख्य व योग हीं शास्त्रें असून त्याच्या मस्तकावरील मुकुट म्हणजे सर्व लोकांना अभय देणारें परमश्रेष्ठ असें ब्रह्मपद होय ॥ १२ ॥ तो ज्या अनंत नामक आसनावर बसलेला असतो तें आसन म्हणजे अव्यक्त प्रकृति असून त्याच्या हातांतील कमळ म्हणजे धर्म, ज्ञान इत्यादिकांनीं युक्त असा सत्त्वगुण होय ॥१३ ॥त्यानें हातांत घेतलेली गदा ही ओज, तेज, बळ इत्यादिकांनीं युक्त असें मुख्य तत्त्व पृथ्वी हें होय. त्याचा श्रेष्ठ प्रतीचा शंख म्हणजे जलतत्त्व असून सुदर्शन चक्र म्हणजे तेजाचें तत्त्व होय ॥१४ ॥ त्याची तरवार म्हणजे सर्वव्यापी असें आकाशतत्त्व समजावें. त्याची ढाल ही तमोगुण होय. त्याचें शार्ङ्ग धनुष्य हें कालास्वरूप असून त्याचा बाणांचा भाता म्हणजे कर्मपरंपरा होय. ॥१५ ॥

इंद्रियें हे त्याचे बाण व विचारशक्तियुक्त मन हा रथ होय. इंद्रियांचे विषय हे त्या रथाचें बाह्यांग समजावें. मुद्रेच्या रूपानें परमात्मा वर, अभय इत्यादि क्रिया दर्शवितो ॥ १६ ॥ देवांच्या पूजेचें स्थान हेंच सूर्यमंडळ असून गुरूपासून मिळणारा मंत्रोपदेश म्हणजे भगवंताची पूजा करण्याचा अधिकार होय. त्या पूजेच्या योगानें जीवांच्या पापाचा नाश होतो. ॥१७॥ भगवंताच्या हातांत जें लीलेसाठीं कमळ घेतलेलें आहे, तें त्याच्या नांवांतील भाग म्हणजे ऐश्वर्य या शब्दाचें अर्थबोधक आहे. त्या भगवंताची चौरी व पंखा हीं धर्म आणि कीर्ति यांचीं ज्ञापक होत ॥ १८ ॥ त्याच्या मस्तकावरील छत्र म्हणजे वैकुंठ. लोक होय. हे ब्राह्मण हो, हें वैकुंठाचें स्थान सर्वथैव निर्भय आहे. गरुड हा तीन्ही वेदांचा दर्शक असून तो ज्या पुरुषाला वाहून नेतो तो पुरुष म्हणजे यज्ञ होय ॥ १९ ॥ प्रत्यक्ष लक्ष्मी ही त्या परमात्म्या श्रीहरीची कधींहि नाश न पावणारी ऐश्वर्यशाली शक्ति असून शास्त्रांची प्रत्यक्ष मूर्ति असा विष्वक्सेन हा गणांचा नायक म्हणून समजावा. तसेच नंद-सुनंद आदिकरून भगवंताचे द्वारपाळ हे श्रीहरीचे अणिमा, लघिमा इत्यादि गुणच होत ॥ २० ॥ हे शौनक मुने, वासुदेव, संकर्षण, प्रद्युम्न व अनिरुद्ध हीं त्या पुरुषोत्तमाचींच स्वतःचीं रूपें असून त्या चारी स्वरूपांनीं होणाऱ्या मूर्तीला चतुर्व्यूह म्हटलें आहे. तो भगवान् विश्व, तैजस, प्राज्ञ व तुरीय या अवस्थांच्या रूपानें व अर्थ, इंद्रियें, विषय, ज्ञान यांच्या योगानें जाणतां येतो ॥२१, २२ ॥ ऐश्वर्यशाली असा समर्थ भगवान् श्रीहरि आपलीं अंगें, उपांगें आयुधें व भूषणें यांनीं युक्त असें चार प्रकारचें चतुर्मूर्तिस्वरूप धारण करितो ॥ २३ ॥ हे ब्राह्मणश्रेष्ठ शौनक मुने, वेदाचें उत्पत्तिस्थान असा हा स्वयंप्रकाश व आपल्याच महाशक्तीनें परिपूर्ण असलेला भगवान् ब्रह्मदेव, विष्णु व रुद्र या नांवांनीं मायेच्या योगें विश्वाची उत्पत्ति, रक्षण व लय करितो व तो वस्तुतः त्या विश्वापासून भिन्न नसतांहि भिन्न आहे असें म्हणतात; पण त्याच्या भक्तांना तो आपलेपणानेंच मिळणारा आहे ॥ २४ ॥ हे श्रीकृष्णा, हे अर्जुनाच्या सख्या, हे यादवनायका, हे दुष्ट राजांचा वंश नष्ट करणाऱ्या भगवंता, हे अमोघवीर्या, हे गोविंदा, गोपींच्या समुदाय

तसाच तुझा भक्तगण तुझ्या गुणांचें गायन करितो. तुझी कीर्ति पवित्र असून तुझें गुण-श्रवण हें अत्यंत शुभकारक आहे. आपल्या भक्ताचें तूं रक्षण कर ।। २५ ।। असो, जो कोणी सकाळीं लवकर उठून हें महापुरुषाचें वर्णन एकनिष्ठ मनानें पवित्र होऊन पठण करील त्याला हृदयांत वास करणाऱ्या ब्रह्माचें ज्ञान होईल ।।२६।।

शौनक मुनि म्हणतात, हे सूता, परीक्षित् राजानें ऐकण्याची इच्छा दर्शविल्यावरून भगवान् शुकाचार्यांनीं त्याला सांगितलें कीं, सूर्य व त्याचे सहा साहाय्यक असें सप्तक प्रत्येक महिन्यांत निरनिराळें असतें ।। २७ ।। तरी त्या अधिकारी सूर्यासह राहून काम करणाऱ्या त्या सूर्यगणांचीं नांवें व कर्तव्यें कशीं आहेत, तें आम्हालां सांगा. ही रचना सूर्यस्वरूपी श्रीहरीचीच असल्यामुळें आम्ही ती श्रद्धापूर्वक ऐकूं ।। २८ ।।

सूत म्हणतो, हे मुने, सर्व प्राणिमात्रांचा अशा आत्मा श्रीविष्णूच्या अनादि अविद्येनें निर्मिलेली ही लोकव्यवस्था या जगांत चक्राप्रमाणें चालू आहे ।।२९।। विश्वाचा आदिकर्ता जो श्रीहरि तोच सूर्य असून तोच सर्व लोकांचा नियामक होय. तो सूर्यच सर्व वैदिक कर्मांचा पाया आहे व ऋषींनीं त्याचेंच अनेक प्रकारें वर्णन केलें आहे ।। ३० ।। हे शौनक मुने ! काळ, देश, क्रिया, कर्ता, करण, कार्य, आगम, द्रव्य आणि फळ असें नऊ प्रकारचें स्वरूप वस्तुतः एकच एक असलेल्या श्रीहरीला यामुळें आलें आहे असें म्हटलें आहे ।। ३१ ।। तो भगवान् काळाचें रूप घेऊन मधु, माधव इत्यादि बारा महिन्यांत लोकव्यवस्था राखण्यासाठीं निरनिराळे बारा गण योजून विश्वांत सचार करितो + ।।३२।।पैकीं मधुमासाचे चालक धाता नामक सूर्य, कृतस्थली नामक अप्सरा, हेति नामक राक्षस, वासुकि नामक नाग, रथकृत् नांवाचा यक्ष, पुलस्त्य नामक ऋषि व तुंबुरु नांवाचा गंधर्व हे सात होत ।।३३।।माधव महिन्याचे चालक अर्यमा सूर्य, पुलह ऋषि,अथौजा यक्ष प्रहेति राक्षस, पुंजिक-स्थली अप्सरा, नारद गंधर्व व कच्छनिर नाग हे सात होत ।। ३४ ।। मित्र सूर्य, अत्रि ऋषि, पौरुषेय राक्षस, तक्षक नाग, मेनका अप्सरा, हाहा गंधर्व व रथस्वन यक्ष हे सात शुक्र महिन्याचे पुरस्कर्ते होत ।। ३५ ।। वसिष्ठ ऋषि, वरुण सूर्य, रंभा अप्सरा, सहजन्य यक्ष, हूहू गंधर्व, शुक्र नाग व चित्रस्वन राक्षस हे सात शुचि महिन्याचे चालक होत ।। ३६ ।। इंद्र सूर्य, विश्वावसु गंधर्व, श्रोता यक्ष, एलापत्र नाग, अंगिरस् ऋषि, प्रम्लोचा अप्सरा व वर्य राक्षस हे सात नभस् मासाचें कार्य चालवितात ।। ३७ ।। विवस्वान् सूर्य, उग्रसेन गंधर्व, व्याघ्र राक्षस, आसारण यक्ष, भृगु ऋषि, अनुम्लोचा अप्सरा व शंखपाल नाग हे नभस्य महिन्याचे अधिकारी असतात ।। ३८ ।।

---

+ या प्रत्येक गणांत सूर्य, अप्सरा, राक्षस, नाग, यक्ष, ऋषि व गंधर्व असे सात अधिकारी असतात म्हणून या गणाला वर सप्तक असें म्हटलें. पुढील एकेका श्लोकांत एकेका महिन्यांतील सप्तकाचीं नांवें दिलीं आहेत.

पूषा सूर्य, धनंजय नाग, वात राक्षस, सुषेण गंधर्व, सुरुचि यक्ष, घृताची अप्सरा व गौतम ऋषि ह्या तपस महिन्यांच्या अधिकृत देवता आहेत ॥३९॥ क्रतु यक्ष, वर्चस राक्षस, भरद्वाज ऋषि, पर्जन्य सूर्य, सेनजित अप्सरा, विश्व गंधर्व व ऐरावत नाग हे तपस्य महिन्याचे कार्यकारी होत ॥४०॥ अंशु सूर्य, कश्यप ऋषि तार्क्ष्य यक्ष, ऋतसेन गंधर्व, उर्वशी अप्सरा, विद्युच्छत्रु राक्षस व महाशंख नाग हे सहस् नांवाच्या महिन्याचे कार्य करितात ॥४१॥ भग नांवाचा सूर्य, स्फुर्ज राक्षस, अरिष्टनेमि गंधर्व, ऊर्ण यक्ष, आयु ऋषि, कर्कोटक नाग व पूर्वचिति नांवाची अप्सरा या सातांचा गण पुष्य मासाचें काम चालवितो ॥४२॥ त्वष्टा सूर्य, ऋचीकाचा पुत्र जमदग्नि ऋषि, कम्बल नाग, तिलोत्तमा अप्सरा, ब्रह्मापेत राक्षस, शतजित् यक्ष व धृतराष्ट्र नांवाचा गंधर्व हे इष नामक महिन्याची व्यवस्था चालवितात ॥४३॥ विष्णु नांवाचा सूर्य, अश्वतर नाग, रंभा अप्सरा, सूर्यवर्चस् नांवाचा गंधर्व, सत्यजित् यक्ष, विश्वामित्र ऋषि व मखापेत नांवाचा राक्षस हे ऊर्ज नांवाच्या महिन्यांतील कार्य चालवितात ॥४४॥ अशा या आदित्यस्वरूपी भगवान् विष्णूच्या निरनिराळ्या विभूति असून सकाळ-संध्याकाळ त्यांचें जे स्मरण करितात त्या मनुष्यांचें पाप त्या प्रतिदिवशीं नष्ट करितात ॥४५॥

बाराहि महिन्यांमध्यें हा सूर्य आपल्या सहा साहाय्यकांसह जगाच्या सभोंवतीं फिरत राहून पृथ्वीवरील लोकांच्या तसेंच स्वर्गात रहाणाऱ्यांच्याहि मनांत उत्तम विचार उत्पन्न करितो ॥४६॥ ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद हे त्याचेंच स्वरूप वर्णन करीत असून त्यांतील मंत्रांनीं ऋषि त्या सूर्यनारायणाचें स्तवन करितात, गंधर्व त्याचें यश गातात व अप्सरा त्याच्यापुढें नृत्य करितात ॥४७॥ त्याचा रथ बांधून सिद्ध करण्याचें काम नाग करितात, यक्ष हे त्या रथाला घोडे जुंपितात आणि बलवान् राक्षस तो रथ पाठीमागून लोटीत नेतात ॥४८॥ निष्पाप अंतःकरणाचे वालखिल्य नामक साठ हजार ब्रह्मर्षि त्याच्या पुढें त्याला सामोरे जातात व त्या सर्वव्यापी परमात्म्याचीं स्तोत्रें गातात ॥४९॥ याप्रमाणें अनादि व अनंत असा भगवान परमेश्वर जो श्रीहरि तो प्रत्येक कल्पामध्यें आपल्या विराट्स्वरूपाची रचना करून लोकांचें रक्षण करितो ॥५०॥

## अकरावा अध्याय समाप्त

———

# अध्याय १२ वा

सूत म्हणतो, थोर अशा श्रीकृष्णभक्तिरूप धर्माला मी वंदन करितों. विश्वकर्त्या श्रीकृष्णाला माझा नमस्कार असो. आतां ब्राह्मणांना नमस्कार करून मी अनादि कालापासून चालत आलेल्या त्रिकालाबाधित धर्माचें वर्णन करितों ॥ १ ॥ हे शौनकादि ऋषि हो, मनुष्यांना मनुष्यपणाच्या दृष्टीनें श्रवण करण्यास अत्यंत योग्य असें काय आहे असा प्रश्न तुम्हीं मला जो विचारिला, त्याचें उत्तर म्हणून हें श्रीविष्णूचें अगाध चरित्र मीं तुम्हांला सांगितलें आहे ॥ २ ॥ या चरित्रांत सर्व पातकांचा नाश करणारा असा जो इंद्रियांचा नियंता व भक्तांचा कैवारी नारायण, त्या श्रीहरीचेंच प्रत्यक्ष गुणवर्णन सर्वत्र केलेलें आहे ॥ ३ ॥ जगाचें आदिकारण व अंतिम आश्रय असें जें अत्यंत रहस्यमय ब्रह्म त्याचेंहि विवेचन यांत आलें असून, ज्ञान व त्याचें स्पष्टीकरण करणारें विज्ञान हीं दोन्ही यथायुक्त प्रकारें वर्णिलीं आहेत ॥ ४ ॥ भक्तियोगाचेंहि विवेचन यांत केलें आहे. +याच्या प्रथम स्कंधांत परीक्षित राजाचें आख्यान व त्या संदर्भानें नारदाची कथा सांगितली असून पुढें परीक्षित् राजाला ऋषिपुत्राचा शाप होऊन तो प्रायोपवेशनास बसला व नंतर त्याची व ब्रह्मश्रेष्ठ शुकाचार्यांची भेट होऊन त्यांचा संवाद झाल्याची कथा आली आहे ॥ ५ ॥ ॥ ६ ॥ दुसऱ्या स्कंधांत योगसाधनानें जीवाला अर्चिः आदिकरून मार्गानें कसें जातां येतें हें सांगून नारद व ब्रह्मदेव यांमधील संवाद, श्रीहरीच्या विविध अवतारांचें संक्षिप्त वृत्त व प्रकृतीपासून महदादि तत्त्वांची उत्पत्ति हीं वर्णिलीं आहेत ॥ ७ ॥ तिसऱ्या स्कंधामध्यें विदुर व उद्धव यांमधील संवाद, तसाच विदुर व मैत्रेय यांमधील संवाद, पुराणसंहितेसंबंधीं प्रश्न, परमेश्वराची प्रलयकालीं राहण्याची रीत, प्रकृतीपासून होणाऱ्या तत्त्वांची उत्पत्ति, त्या तत्त्वांपासून पुढें आणखी होणाऱ्या सात विकारांची उत्पत्ति, त्यांपासून ब्रह्मांडाची निपज व त्याच्यापासून झालेली विराट् पुरुषाची उत्पत्ति, स्थूल व सूक्ष्म अशा कालस्वरूपाचें वर्णन, कमलाची उत्पत्ति, महासागरांतून पृथ्वी वर काढीत असतां परमेश्वरानें केलेला हिरण्याक्षाचा वध, देव–पशुपक्षी–वृक्षलता इत्यादिकांचा प्रादुर्भाव, रुद्राची उत्पत्ति, ब्रह्मदेवाच्या शरिराचे अर्धे पुरुष व अर्धे स्त्री असें परिवर्तन, व त्यापसून स्वायंभुव मनूचा व स्त्रियांचें आदि मूळ जी शतरूपा तिचा जन्म, कर्दम प्रजापतीच्या स्त्रियांच्या संततीचें वर्णन, महात्म्या भगवान् कपिलाचा अवतार व बुद्धिमान् कपिलाचा देवहूतीशीं झालेला संवाद, असे विषय आले आहेत ॥ ८ ॥ ९ ॥ १० ॥ ११ ॥ १२ ॥ १३ ॥

---

+ तिसऱ्या श्लोकापासून येथपर्यंतच्या अडीच श्लोकांत श्रीमद्भागवताचें सामान्य स्वरूप सांगितलें. आतां पुढें स्कंधवार अनुक्रमणिका सांगितली आहे. या अनुक्रमणिकेमध्यें सारेच विषय आले आहेत असें नाहीं व आले आहेत ते तरी मुळांतील क्रमानें आले आहेत असेंहि नाहीं. पुष्कळ ठिकाणीं क्रम पालटला आहे.

चौथ्या स्कंधांत ब्रह्मदेवाच्या मरीचि आदिकरून नऊ पुत्रांची उत्पत्ति दक्षप्रजापतीच्या यज्ञाचा विध्वंस, ध्रुवाचें चरित्र, पृथुराजाचें वृत्त व त्यानंतर प्राचीनबर्हि राजाची कथा हे विषय वर्णिले आहेत ॥ १४ ॥ हे शौनकादि मुनि हो, प्राचीनबर्हि राजा व नारद यांचा संवाद चतुर्थ स्कंधाच्या शेवटीं वर्णिल्यावर पांचव्या स्कंधांत प्रियव्रत, नाभि, ऋषभ व भरत यांचीं चरित्रें सांगितलीं आहेत ॥ १५ ॥ त्याचप्रमाणें द्वीप, वर्ष व समुद्र, पर्वत व नद्या यांचें वर्णन, ज्योतिश्चक्राची रचना, पातळें व नरक यांची व्यवस्था हे विषय त्यांत आले आहेत ॥ १६ ॥

सहाव्या स्कंधांत प्रचेत्यांपासून दक्षाची उत्पत्ति व पुढें दक्षाच्या कन्यांची संतति यांचें वर्णन आहे. या दक्षकन्यांपासून देव, असुर, मनुष्य, पशु, पक्षी इत्यादिकांची उत्पत्ति झाली ॥ १७ ॥ हे शौनकादि मुनि हो ! त्वष्ट्याचा पुत्र जो वृत्रासुर त्याच्या जन्माची व वधाची कथा सहाव्यांत सांगितल्यावर सातव्यांत हिरण्याक्ष व हिरण्यकशिपु यांचें व प्रल्हादाचें चरित्र वर्णिलें आहे ॥ १८ ॥ आठव्या स्कंधांत मन्वंतरांची रचना सांगून गजेन्द्रमोक्षाची कथा व विष्णूचे मन्वंतरांत होणारे जे हयग्रीवादि अवतार त्यांचें वर्णन हीं दिलीं आहेत ॥ १९ ॥ जगत्पति श्रीहरीच्या कूर्म, धन्वंतरी, मत्स्य व वामन या अवतारांचें वर्णनहि त्यांत असून देवांना अमृत प्राप्त करून देण्यासाठीं महासागराचें मंथन केल्याची कथाहि आली आहे ॥ २० ॥ तसेंच आणखी देव व दैत्य यांमधील महायुद्धाचें वर्णन सांगून नंतर नवव्या स्कंधांत चंद्रवंश व सूर्यवंश यांचा संक्षिप्त इतिहास दिला आहे. त्यांत इक्ष्वाकूचा जन्म, त्याचा वंश, त्याचप्रमाणें महात्म्या सुद्युम्नाची कथा हीं आलीं आहेत ॥ २१ ॥ या स्कंधांत इलेचें व तारेचें आख्यान सांगून पुढें सूर्यवंशाच्या वर्णनांत शशाद, नृग इत्यादि राजांच्या कथा दिल्या आहेत ॥ २२ ॥ सुकन्येची कथा, शर्यातीचें वृत्त, बुद्धिमान् ककुत्स्थाची कथा, खट्वांग व मांधाता या राजांचें वृत्त, सौभरीचें आख्यान व सगराची कथा याहि त्यांतच सांगितल्या आहेत ॥ २३ ॥ तशीच कोसल देशाचा अधिपति जो दाशरथि राम त्याची पापनाशक कथा, निमीच्या शरीरत्यागाचें वर्णन व त्याच्यापासून जनकवंशाची उत्पत्ति या गोष्टीहि तेथें सांगितल्या आहेत ॥ २४ ॥ भार्गवकुलदीपक जो परशुराम त्यानें पृथ्वी निःक्षत्रिय केल्याची कथा, सोमवंशीय इलापुत्र पुरूरव्याची कथा, तसेंच नहुष व ययाति राजांचें वृत्त हींहि सांगितलीं आहेत ॥ २५ ॥ दुष्यंतपुत्र भरताचें आख्यान, शंतनु व त्याचा पुत्र भीष्म यांची कथा व ययातीचा वडील पुत्र जो यदु त्याच्या वंशाचें वर्णन हींहि त्यांतच आलीं आहेत ॥ २६ ॥ या यदुवंशांतच भगवान् परमात्म्यानें श्रीकृष्ण नांवानें अवतार घेतला. दहाव्या स्कंधांत, श्रीकृष्ण वसुदेवाच्या घरीं मथुरेंत जन्मला व तेथून गोकुळांत जाऊन लहानाचा मोठा झाला हें वृत्त आलें आहे ॥ २७ ॥ असुरांचें पारिपत्य करणाऱ्या त्या श्रीकृष्णाचीं अनेक चरित्रें या स्कंधांत वर्णिलीं आहेत. पूतनेचे प्राण व दूध यांचें प्राशन केल्याची कथा व बालवयांतच छकडा उलथून पाडिल्याचें वृत्त हीं तेथें प्रथम सांगितलीं

आहेत ॥ २८ ॥ पुढें तृणावर्ताला चेंगरून टाकिल्याची कथा, तसेंच बकासुर व वत्सासुर यांच्या वधांचें वृत्त, आणि धेनुकासुर व त्याचा भाऊ प्रलंबासुर यांच्या नाशाचें वर्णन हे विषय सांगितले आहेत ॥ २९ ॥ पुढें सर्वत्र पसरू पाहणाऱ्या वणव्यांत सांपडलेल्या गोपांचें कृष्णानें रक्षण केलें व कालिय सर्पाचें पारिपत्य करून अजगरापासून नन्दाला सोडविलें ही कथा आहे ॥ ३० ॥

नंतर गोपकन्यांचें कात्यायनी व्रत व त्या प्रसंगानें कृष्ण त्यांच्यावर प्रसन्न झाल्याची कथा देऊन यज्ञ करणाऱ्या ब्राह्मणाच्या स्त्रियांवर त्यानें केलेला अनुग्रह व ब्राह्मणाचा पश्चात्ताप यांचें वर्णन केलें आहे ॥ ३१ ॥ त्यापुढें गोवर्धन उचलून गोकुळाचें रक्षण केल्याचें व त्या प्रसंगानें इंद्र व कामधेनु यांनीं श्रीकृष्णाची पूजा व अभिषेक केल्याचें वृत्त देऊन रात्रौ कृष्णानें गोपींशीं केलेल्या क्रीडेचें वर्णन केलें आहे ॥ ३२ ॥ त्यानंतर दुष्टबुद्धि शंखचूड दैत्य, तसेंच अरिष्टासुर व केशी दानव यांचा वध कृष्णानें केल्याचें सांगून पुढें अक्रूराचें गोकुळांत आगमन व नंतर त्याच्यासह राम व कृष्ण यांचें मथुरेस निघून जाणें या कथा आल्या आहेत ॥ ३३ ॥

कृष्ण गेल्यामुळें गोपींनीं केलेला विलाप वर्णून राम व कृष्ण मथुरेस आल्यावर त्या नगरींतील स्थळें त्यांनीं पाहिलीं व कुवलयापीड नामक कंसाचा हत्ती, तसेंच चाणूर व मुष्टिक हे मल्ल आणि स्वतः कंस इत्यादिकांचा वध केला इत्यादि कथा सांगितल्या आहेत ॥ ३४ ॥ त्यापुढें सांदीपनी गुरूच्या मृत पुत्राला परत आणिल्याची कथा सांगून श्रीकृष्णानें मथुरेंत राहून यादव मंडळीचे हेतु कसे पुरविले तें वर्णिलें आहे ॥ ३५ ॥ हे शौनकादि मुनि हो, यानंतर उद्धव व बळराम यांच्या साहाय्यानें कृष्णानें जरासंधानें अनेक वेळां आणिलेल्या सैन्याचा नाश केला, तसाच यवनाधिप कालयवनाचा वध करवून कुशस्थली म्हणजे द्वारकानगरीची स्थापना केली या कथा सांगितल्या आहेत ॥ ३६ ॥

त्यापुढें स्वर्गांतील इन्द्राच्या सुधर्मानामक राजसभेंतून कृष्णानें पारिजात वृक्ष आणिल्याची कथा, शत्रूंना युद्धांत जिंकून रुक्मिणीचें हरण केल्याचें वृत्त, तसाच चेदिराजा शिशुपाल, पौंड्रक, वासुदेव, शाल्व, दुष्टबुद्धि दन्तवक्त्र, शंबरासुर, द्विविद वानर, पीठ, मुर दैत्य, पञ्चजन दैत्य इत्यादिकांचें माहात्म्य व त्यांचा रामकृष्णांनीं केलेला वध, वाराणशी नगरीचें दहन, आणि पांडवांच्या निमित्तानें भूमीचा भार हलका करण्यासाठीं करविलेलें भारती युद्ध हे विषय वर्णिले आहेत ॥३७॥३८॥३९॥४०॥

अकराव्या स्कंधामध्यें ब्राह्मणांच्या शापाच्या निमित्तानें आपल्या यादव कुळाचा कृष्णानें संहार करविला व उद्धवाशीं संवाद करून उत्तम प्रकारचें ज्ञान त्याला सांगितलें हा वृत्तान्त आला आहे ॥४१॥ उद्धवाला केलेल्या या ज्ञानाच्या उपदेशांत सर्व आत्मविद्या सांगितली असून वर्णाश्रमधर्माचा निश्चितपणें विचार केला आहे. त्यानंतर श्रीकृष्णानें

आपल्या योगसामर्थ्यानें मर्त्य शरीराचा त्याग केल्याचें वर्णन आहे ॥ ४२ ॥ बाराव्या स्कंधांत चारी युगांचीं लक्षणें व त्यांतील मनुष्यांच्या वागणुकींचे प्रकार सांगून कलियुगांत मनुष्यांना उपद्रव कसा होईल तें दर्शविलें आहे. चार प्रकारचे प्रलय व तीन प्रकारची उत्पत्ति हीं त्यांत पुढें सांगितलीं असून ज्ञानवान् झालेल्या परीक्षित् राजानें केलेल्या देह त्यागाचें वृत्त, व्यासानें केलेल्या वेदांच्या शाखांची माहिती, मार्कंडेयाची सुंदर कथा, विराट् पुरुषाच्या शरीराच्या रचनेचे वर्णन आणि विश्वाच्या अंतर्यामीं असलेल्या सूर्याच्या रचनेचें वर्णन हे विषय आले आहेत ॥ ४३ ॥ ४४ ॥ हे ब्राह्मणश्रेष्ठ शौनकादि मुनि हो, तुम्हीं मला जो प्रश्न विचारिला त्याचें मीं याप्रमाणें यथामति उत्तर दिलें आहे. या वर्णनांत परमात्म्याच्या अवतारांतील लीला व पराक्रम सर्वत्र गायिलेले आहेत ॥ ४५ ॥ विहिरींत किंवा दुसऱ्या खळग्यांत पडलेला, जिन्यावरून पाय निसटलेला, दुःखानें गांजलेला किंवा शिंक येऊन पराधीन झालेला, जो कोणी मोठ्यानें 'हरये नमः'—श्रीहरीला नमस्कार असो असें म्हणेल तो सर्व पातकांपासून मुक्त होईल. ॥ ४६ ॥

अंतरहित अशा सर्वसमर्थ परमेश्वराचा प्रभाव ऐकिल्यावर त्याचें गुणगायन करणाऱ्या पुरुषांच्या अंतःकरणांत प्रवेश करून तो परमात्मा त्यांचीं सर्व संकटें नाहींशी करितो. सूर्य जसा अंधकार नष्ट करितो किंवा झंझावात जसा मेघ उडवून देतो, तसाच हा प्रकार समजावा ॥ ४७ ॥ ज्या वर्णनामध्यें भगवान् परमात्म्याचे गुणानुवाद नाहींत तें वर्णन खोटें व दोषी असून त्यांतील कथा दुष्ट कथा होत. ज्यांत भगवंताच्या गुणांचा उत्कर्ष वर्णिला तेंच वर्णन खरें, तेंच पवित्र व तेंच पुण्यकारक होय ॥ ४८ ॥

उत्तम कीर्ति अशा भगवंताचें यश सर्वत्र गायिलेलें आहे. तेंच वर्णन रमणीय, तेंच नित्य नवीनासारखें मनोहर, तेंच मनाला मोठा आनंद देणारें व तेंच मनुष्यांच्या दुःखाचा सागर आटवून टाकणारें होय ॥ ४९ ॥ सुंदर शब्दांनीं केलेलें वर्णन आहे, पण त्यांत जगाला पवित्र करणारें असें श्रीहरीचें यश मात्र कोठेंहि गायिलेलें नाहीं; तर तें कावळ्याचें बुडी मारण्याचें डबकें होय; हंसांनीं ज्याचा आश्रय करावयाचा तसल्या पवित्र तीर्थासारखें तें नव्हे. कारण ज्यांत भगवान् अच्युताचें गुणवर्णन आहे, तेथेंच निष्पाप साधु रममाण होतात ॥ ५० ॥ आतां एखादें वर्णन असें असेल कीं, त्यांत प्रतिश्लोकांत कांहीं तरी असंबद्ध आहेच; पण साधुलोक ज्याचें नित्य श्रवण, गायन व स्तवन करतात त्या अंतरहित अशा परमात्म्याचीं त्याच्या पराक्रमांनीं चिह्नित झालेलीं नांवें सर्वत्र गायिलेलीं आहेत, तर त्या वर्णनानें लोकांच्या पापांचा नाश होईल ॥ ५१ ॥ निष्कर्म अशा ब्रह्माचें उपाधि नष्ट करणारें ज्ञान झालें, तरी तें जर श्रीकृष्णभक्तीनें युक्त नसेल, तर त्याची फारशी योग्यता नाहीं. मग अत्यंत उत्तम असेंहि कर्म जर परमेश्वराला अर्पण केलेलें नसेल, तर त्याची योग्यता कितीशी असणार ? तें नित्य दुःखदायकच असावयाचें ॥ ५२ ॥ वर्ण व आश्रम यांच्या आचारांचें पालन, तपश्चर्या, वेदाध्ययन इत्यादिकांविषयीं जो मोठा परिश्रम

माणसें करितात, त्याचें फळ म्हणजे कीर्ति व संपत्ति हेंच असतें; पण श्रीहरीचे गुणानुवादाचें श्रवण, मनन इत्यादि केल्यानें त्या लक्ष्मीपतीच्या चरणकमलांचें कधींहि विस्मरण होत नाहीं ॥ ५३ ॥ आणि श्रीकृष्ण परमात्म्याच्या चरणाचें नित्य स्मरण हें सर्व पातकें नष्ट करून शांति उत्पन्न करितें, अन्तःकरण शुद्ध करितें, परमात्म्यावर भक्ति जडवितें आणि विज्ञान व वैराग्य यांनीं युक्त असें ज्ञानहि देतें ॥ ५४ ॥ हे ब्राह्मणश्रेष्ठ शौनकादि मुनि हो, तुम्ही खरोखर मोठे भाग्यशाली आहां. कारण सर्व भूतांचा अंतर्यामी जो सर्वसमर्थ भगवान् नारायण त्याची आपल्या मनांत स्थापना करून मोठ्या भक्तीनें त्याची सेवा करितां ॥५५॥ पूर्वी परीक्षित् राजा प्रायोपवेशनास बसला असतां मोठमोठ्या ऋषींनीं ऐकिण्याची इच्छा दर्शविली व त्यांच्या सभेंत शुकाचार्यांनीं हें आत्मज्ञान सांगितलें. त्या वेळीं जें मीं त्यांच्या तोंडून ऐकिलें, त्याचें तुम्ही मला पुनः आज स्मरण उत्पन्न केलें ॥ ५६ ॥ हे शौनकादि मुनि हो, वर्णन करण्यास योग्य असे बहुत पराक्रम करणाऱ्या भगवान् वासुदेवाचें हें माहात्म्य मीं तुम्हांला सांगितलें आहे. तें श्रवण केल्यानें सर्व पातकांचा नाश होतो ॥ ५७ ॥ जो कोणी हें एकनिष्ठ भावानें दुसऱ्याला प्रत्येक दिवशीं प्रहरभर, निदान थोडा वेळ तरी ऐकवील, तसेंच जो श्रद्धेनें तें नित्य श्रवण करील, तो स्वतःलाच पवित्र करून घेईल ॥ ५८ ॥ हें माहात्म्य द्वादशीला किंवा एकादशीला ऐकणाराला दीर्घायुष्य प्राप्त होईल आणि उपवास करून शुद्धपणानें जो याचें पठण करील, तो तेणेंकरून सर्व पातकांपासून मुक्त होईल ॥ ५९ ॥ पुष्कर तीर्थावर, मथुरेंत किंवा द्वारकेंत इंद्रियनिग्रहपूर्वक उपवास करून जो या भागवतसंहितेचें पठण करील, तो भयापासून मुक्त होईल ॥ ६० ॥ त्या परमात्म्याच्या गुणसंकीर्तनाच्या योगानें देव, ऋषि, सिद्ध, पितर, मनु व राजे हे तें गुणकीर्तन करणाऱ्या व ऐकणाऱ्या पुरुषांचे मनोरथ पूर्ण करितात ॥ ६१ ॥ ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद यांचें अध्ययन केल्यानें ब्राह्मणाला मध, तूप व दूध यांचें प्रवाह खावयास मिळतात. आता हें फळ तर ही श्रीमद्भागवतसंहिता पवित्र होऊन पठण केल्यानें ब्राह्मणाला मिळतेंच, पण आणखी त्या पठणाच्या योगें भगवंतानें सांगितलेलें जें परमश्रेष्ठ स्थान त्याचीहि त्याला प्राप्ति होते ॥ ६२ ॥ ६३ ॥ या संहितेचें अध्ययन केल्यानें ब्राह्मणाला ज्ञान प्राप्त होतें, क्षत्रियाला सकळ पृथ्वीचें राज्य मिळतें, वैश्य भांडाराचा अधिपति होतो आणि शूद्राची पातकापासून शुद्धि होते ॥ ६४ ॥ कलीच्या अनेक दोषांचा नाश करणारा विश्वाचा नियंता असा जो श्रीहरि त्याचें इतर पुराणांत असें वारंवार गुणगायन केलेलें नाहीं; पण या भागवतसंहितेमध्यें नाना प्रकारच्या कथा सांगण्याच्या निमित्तानें भगवान् परमात्म्याचा पदोपदीं गुणानुवाद गायिला आहे ॥ ६५ ॥ असो. त्या जन्मरहित व अन्तरहित अशा आत्मतत्त्वाला मी नमस्कार करितों. जगाची उत्पत्ति, रक्षण व नियमन हीं करण्याचें सामर्थ्य त्यालाच आहे. त्या अविनाशी परमात्म्याचें योग्य स्तवन करणें हें ब्रह्मदेव, इंद्र, शंकर इत्यादि देवांनाहि अत्यंत कठीण आहे. ( मग तेथें आमच्यासारख्यांचा काय पाड ? ) ॥ ६६ ॥

परिपक्व अशा प्रकृति, पुरुष, महत्, अहंकार व पंचमहाभूतांचीं सूक्ष्म स्वरूपें या नऊ शक्तींनीं ज्यानें स्वतःच्याच ठिकाणीं हें स्थावरजंगमात्मक विश्व रचिलें आहे त्या केवळ ज्ञानस्वरूपी व त्रिकालाबाधित अशा भगवान् देवश्रेष्ठ श्रीहरीला नमस्कार असो ।। ६७ ।। ( आतां शेवटीं ) आत्मसुखाच्या प्राप्तीमुळें ज्याचें मन अगदीं शांत झालें आहे व त्यामुळें ज्याची द्वैतकल्पना सर्वस्वीं नष्ट झाली असूनहि परमात्म्याच्या मनोहर लीलांनीं ज्याचें अंतःकरण वेधून गेलें आहे व म्हणून ज्यानें त्या परमात्म्याच्या स्वरूपाचें आविष्करण करणारें असें हें भागवतपुराण कृपादृष्टीनें विस्तृतपणें रचिलें, त्या सर्वपापनाशक अशा व्यासपुत्र शुकाचार्यांना मी नमस्कार करितों ।। ६८ ।।

## बारावा अध्याय समाप्त

---

# अध्याय १३ वा

सूत म्हणतो, ब्रह्मदेव, वरुण, इंद्र, रुद्र, मरुत् इत्यादि देव दिव्य स्तोत्रें गाऊन ज्यांची स्तुति करितात; सहा अंगें, पदें, क्रम, उपनिषदें यांनीं युक्त अशा वेदसंहितांच्या योगें सामवेदी ज्याचे गुण गातात; ध्यानाच्या योगानें तल्लीन केलेल्या मनोवृत्तींच्या साहाय्यानें योगी ज्याचें दर्शन घेतात आणि देव, असुर इत्यादिकांतील कोणालाहि ज्याचा कधींही पार लागलेला नाहीं अशा भगवंताला नमस्कार असो ॥ १ ॥

पाठीवर वेगानें फिरणाऱ्या मंदर पर्वताच्या शिळांच्या टोकांनीं घर्षण केल्यामुळें कूर्मावतारीं भगवंताला झोंप लागून तो घोरूं लागला त्या वेळचे त्याचे श्वासोच्छ्वास तुमचें रक्षण करोत. त्या श्वासोच्छ्वासाच्या एकसारख्या मिळणाऱ्या अल्पशा धक्क्यांमुळें सागराचें पाणी तीरापासून एकदां जें भरतीओहोटीच्या रूपानें वारंवार मागें-पुढें होऊं लागलें तें अद्यापपर्यंत सारखें अविश्रांत चालू राहिलें आहे ॥२॥ असो. आतां पुराणांच्या श्लोकसंख्या कशा आहेत, या भागवतपुराणाची उत्पत्ति कशी झाली, त्याचें दान कसें करावें, त्याच्या दानाचें व पठनाचें माहात्म्य कसें आहे या गोष्टी सांगतों त्या समजून घ्या ॥३॥ ब्रह्मपुराणाची संख्या दहा हजार श्लोक. पद्मपुराणाची पंचावन्न हजार, विष्णुपुराणाची तेवीस हजार व शिवपुराणाची चोवीस हजार संख्या आहे ॥ ४ ॥ श्रीभागवतपुराण अठरा सहस्र श्लोकांचें असून नारदपुराण पंचवीस हजार श्लोकांचें आहे. मार्कंडपुराण नऊ हजार श्लोकांचें व अग्निपुराण पंधरा हजार चारशें श्लोकात्मक आहे ॥५॥ भविष्यपुराणांत चौदा हजार पांचशें श्लोक असून ब्रह्मवैवर्तांत अठरा हजार आहेत व लिंगपुराणांत अकरा हजार आहेत ॥६॥ वराहपुराणाचे चोवीस हजार श्लोक असून स्कंदपुराणाचे एक्याऐशीं हजार एकशें आहेत. वामनपुराणाची श्लोकसंख्या दहा हजार सांगितली आहे ॥८॥ कूर्मपुराणांत सतरा हजार श्लोक आहेत असें सांगितलें असून मत्स्यपुराणाचे चौदा हजार सांगितले आहेत. गरुडपुराण एकोणीस हजार श्लोकात्मक असून ब्रह्मांडपुराणांत चौदा हजार श्लोक आहेत ॥ ८ ॥ याप्रमाणें पुराणांची श्लोकसंख्या एकूण चार लक्ष श्लोक इतकी सांगितली आहे. त्यांत श्रीभागवताची संख्या अठरा हजार सांगितली आहे ॥९ ॥ आपल्या नाभिकमळावर बसलेल्या ब्रह्मदेवाला संसाराची भीति वाटून तो घाबरून गेला असतां भगवंतानें कृपाळु होऊन हें भागवतपुराण त्याला सांगितलें ॥१० ॥ यांत आरंभीं, मध्यें व अंतीं सर्वत्र वैराग्यजनक आख्यानें गुंफलीं असून त्यांतील भगवंताच्या अनेक लीलाकथा अमृतासारख्या मधुर असल्यामुळें सज्जन व देव यांना त्यापासून फार आनंद होतो ॥ ११ ॥

सर्व वेदान्तशास्त्राचें रहस्य असें जें ब्रह्म व आत्मा यांचें एकत्व प्रतिपादन

एकत्वच या पुराणाचाहि विषय असून, मोक्षप्राप्ति हाच त्याचा हेतु आहे ॥ १२ ॥ भाद्रपदी पौर्णिमेला सोन्याच्या चौरंगासह भागवताची पोथी जो दान देतो, त्याला उत्तम गति प्राप्त होते ॥ १३ ॥ जोंपर्यंत श्रेष्ठ असें हें भागवतपुराण प्रत्यक्ष पुढें दिसलें नाहीं, तोंपर्यंतच इतर पुराणांची सज्जनांच्या सभेंत शोभा असते ॥ १४ ॥ श्री-भागवत हें सर्व वेदान्तशास्त्राचें रहस्य प्रतिपादन करितें असें म्हटलें आहे, एकदां त्याच्या अमृतासारख्या रसानें जो तृप्त झाला, त्याला दुसऱ्या कशामध्यें केव्हांहि आनंद वाटत नाहीं. ॥ १५ ॥

नद्यांमध्यें जशी गंगा किंवा देवांमध्यें जसा भगवान् विष्णु अथवा विष्णुभक्तांमध्यें जसा शंकर तसें सर्व पुराणांमध्यें हें भागवत श्रेष्ठ होय ॥ १६ ॥

सर्व पवित्र क्षेत्रांत जसें सर्वश्रेष्ठ काशीक्षेत्र, तसें हे शौनकादि मुनि हो, सर्व पुराणांमध्यें श्रीमद्भागवत समजावें ॥ १७ ॥ असें जें हें पापहरक भागवतपुराण तें विष्णुभक्तांना अत्यंत आवडणारें आहे. त्यांत शुकाचार्यांसारख्या परमहंसांना प्राप्त होणारें निर्मळ ज्ञानच सांगितलें असून ज्ञान, विज्ञान, वैराग्य व भक्ति यांनीं युक्त असा कर्मसंन्यास वर्णिला आहे. हें विवेचन भक्तिपूर्वक ऐकणारा, वाचणारा व त्याचें मनन करणारा पुरुष मुक्त होतो ॥ १८ ॥

भागवतस्वरूपी अप्रतिम ज्ञानदीप प्रथम परमात्म्या भगवान् विष्णूनें ब्रह्मदेवाला प्रकट केला. नंतर त्यानेंच ब्रह्मदेवाच्या रूपानें नारदमुनीला तो दाखविला. पुढें नारद-मुनीच्या स्वरूपानें परमात्म्यानें तो कृष्णद्वैपायन व्यासांना दिला. नंतर व्यासमुखानें तो योगीश्रेष्ठ शुकाचार्यांना मिळाला व शुकाचार्यांनीं दयार्द्र अंःतकरणानें तो परीक्षित् राजाला दिला. त्या शुद्ध, निर्मळ, शोकरहित, मृत्युरहित, सत्यस्वरूपी परमात्म्याचें मी ध्यान करितों ॥ १९ ॥ ज्या सर्वसाक्षी भगवान् वासुदेवानें हें भागवतरूपी ज्ञान मोक्षाची इच्छा करणाऱ्या ब्रह्मदेवाला सांगितलें, त्याला माझा नमस्कार असो ॥ २० ॥ ज्या योगिश्रेष्ठ ब्रह्मस्वरूपी शुकाचार्यांनीं संसाररूप सर्पानें दंश केलेल्या परीक्षित् राजाला त्या दंशाच्या परिणामापासून वांचविलें, त्या शुकाचार्यांना मी नमस्कार करितों ॥ २१ ॥ हे सर्वसमर्थ परमेश्वरा, तूंच आमचा संरक्षक आहेस; तरी जन्मोजन्मीं तुझ्या पायांची भक्ति जेणेंकरून आम्हांला जडेल तसें कर ॥ २२ ॥ ज्याच्या नामस्मरणानें सर्व पापांचा नाश होतो व ज्याला नमस्कार केल्यानें सर्व दुःखांचा परिहार होतो, त्या पभश्रेष्ठ श्रीहरीला मी नमस्कार करितों ॥ २३ ॥

## तेरावा अध्याय समाप्त

## ॥ श्रीमद्भागवतं समाप्तम् ॥